# स्त्री-जीवनाचा आधार



स्त्रियाचे जो · बं ··· साडू' ब्रदर्स औषधें फार सहाय्य हे

लहान मुलं ी ी आसव 'सांडू' अरविंदासव; ··शीर व रजोदर होणेंसाठीं 'सांडू' आर्तवशुद्धीका ावा.

गर्भाशयाचे अशक्तप स्त्रियांच रोगपरंपरा सुरू होत असलेने ाच 'सांडू' दशमूलारिष्ट घेणें फायद्याचें

दिवस राहिल्यानेतर गर्भवतीच्या पोषणासाठी 'साडू' गयुर ·नणी गर्भरक्षक) हे अनुभवसिद्ध औ' व आ· ·ळंतपणीं पहिले १० दिवसात 'सांडू' ·बकार ं १ व १० दिवसा नंतर ३ महिने हां ·तों ' डू' बाळतकाढा नं २ व तान्ह्या बाळास र ·ाळर देणें फायदेशीर ठरतें

र · ·द ·ची औषधें वापरली जातात

विशेष मा· · ीं पत्रव्यवहार करावा.

---

# द. कृ. सांडू ब्रदर्स (चेंबूर) लि.

चेंबूर फोन-८७३१३ (ब्राम्ही तेलाचे आद्य कारखानदार) मुंबई फोन-३४२३४

# कोणे एके काळीं—

लेखक

मो. ग. रांगणेकर

कुलवधु, आशीर्वाद, माझें घर, माहेर,
एक होता म्हातारा, कन्यादान, रंभा
इत्यादि नाटकांचा कर्ता.

— बॉम्बे बुक डेपो —

टे. नं. ३३८९२

गिरगांव, मुंबई ४.

[ आवृत्ति २ री ]

किंमत १॥ रुपया

नाटकाचा पहिला प्रयोग 'नाट्य-निकेतन'नें भारतीय विद्याभवन, मुंबई येथें शनिवार, ता. १४-१-१९५० रोजीं रात्रीं ९ वा. करून दाखविला. त्यावेळीं भाग घेतलेले कलावंत :

| | |
|---|---|
| **कल्याणी** | ज्योत्स्ना भोळे |
| **अंबू** | मंगला रानडे |
| **हणमंतराव** | व्ही. डी. पंडित |
| **दामुअण्णा** | श्रीपाद जोशी |
| **जयंता** | चंद्रकांत गोखले |
| **शिरसाट** | करमरकर |

**दिग्दर्शक**
मो. ग. रांगणेकर

**संगीत दिग्दर्शक**
मा. कृष्णराव

या पुस्तकाच्या कव्हरवरील छायाचित्र श्री. बा. ना. भट यांनीं घेतलें आहे.

या नाटकाचा अगर त्यांतील कांहीं भागाचा रूपांतरासाठीं, प्रयोगासाठीं अगर दुसऱ्या कोणत्याही कारणासाठीं उपयोग करावयाचा असल्यास आधीं लेखकाची लेखी परवानगी घ्यावी. तसें न केल्यास कायदेशीर इलाज केला जाईल.

आमचीं उत्कृष्ट पुस्तकें

# झपाटलेला प्रवासी

ऐशीं दिवसांत पृथ्वीप्रदक्षिणा करणाऱ्या जूल [illegible] मनोरंजक धाडशी वृत्तांत. अनुवादक : भा. रा. भागवत. श्री. दलाल यांचें तीन रंगी दोन्हीं अंगी उत्कृष्ट मुखपृष्ठ. किंमत रु. १॥

# प्रीतीचा खेळ

दत्ता वैद्य यांची ही अद्भुतरम्य कादंबरी एकदां हातांत घेतली तर पुरी वाचल्याखेरीज सोडवणार नाहीं. श्री. मुळगांवकर यांचें नयनमनोहर तिरंगी मुखपृष्ठ सजावट. किंमत रु. ३

# रंभा

श्री. मो. ग. रांगणेकर यांचा हा पुनर्जन्माच्या कल्पनेवर आधारलेला नवा खेळ आज बृहन्महाराष्ट्रांत गाजून राहिला आहे. नाटक वाचतांना नाटक पाहिल्याचा पूर्ण आनंद लाभतो. अंतर्बाह्य चित्रांची सजावट. किं. रु. १॥

अग्रेसर लेखकांचे दोन उत्कृष्ट कथासंग्रह

(गंगाधर गाडगीळ) — **कबुतरें**

(श्री. अरविंद गोखले) — **कमळण**

(किंमत तीन रुपये प्रत्येकीं)

## — बॉम्बे बुक डेपो —

गिरगांव, मुंबई ४.




## याच प्रमाणें तुम्हांला

# जीवन-रक्षक काढा

## घेणें जरूर आहे

शक्ति वाढते, उत्साह वाढतो, पचनक्रिया सुधारते, शौचास साफ होऊन सणसणीत भूक लागते. कडकी, खोकला, हातपाय वळणें, थकल्या सारखें वाटणें, अंगातील उष्णता, बारीक बारीक येणारा 'ताप' आणि

"रक्तशुद्धीसाठीं"

# "जीवन रक्षक काढा"

**अनुभाविक उपाय आहे**

**योगीराज फार्मसीचीं "औषधें" दुकानदारांकडे मिळतात**

प्रमुख विक्रेते:—**भागिरथ कंपनी.**

**लालबाग, मुंबई नं. १२.**

**ोगीराज फार्मसी. मुंबई, १२.**

# अंक १ ला

[ पुण्यांतील सदाशिव पेठेंतील एक जुनें घर. उजव्या बाजूस बाहेर जाण्याचा दरवाजा. समोरच्या खिडकींतून गल्लींतील पलीकडचीं पडकीं, जुनाट घरें दिसत आहेत. समोर डाव्या बाजूस वर जाण्याचा जिना आहे आणि त्याच्या अलीकडे माजघराचा दरवाजा आहे. घर जुन्या तऱ्हेचं आहे, हें येथील एकंदर सामानसुमानावरून दिसत आहे. भिंतीवर फळ्या मारून त्यावर वर्तमानपत्रांच्या फायली, मासिकें वगैरे धूळ खात पडलीं आहेत. भिंतींवर नाना तऱ्हेचीं कॅलेंडरें—त्यांत कांहीं गेल्या दोन तीन वर्षांचींही आहेत—लटकत आहेत. कुठले तरी जुने "फॅमिली ग्रुप्स" आहेत. माजघरांतल्या दरवाजावर जुनें मण्यांचें तोरण आहे. बाहेर जाण्याच्या दरवाजाच्या अलीकडे भिंतीला टेंकून एक भलें मोठें टेबल आहे. त्यावर वर्तमानपत्रांच्या फायली, कागदपत्रें, पुस्तकें, दौत, सिगरेटचे डबे वगैरे सामान इतकें अस्ताव्यस्त पडलें आहे कीं, हें पुण्यांतल्या एखाद्या संपादकाचें घर असावें, असा एखाद्याचा ग्रह व्हावा. आणि खरेंच, हें हणमंतराव दीक्षित, संपादक 'ऐरावत' यांचं घर असून त्यांचा नुकताच बी. ए. झालेला मुलगा जयंता जिन्यावरून हातांत कोट घेऊन येत आहे आणि त्याच्यामागें त्याचा कोट धरून अंबू येत आहे. ]

**अंबू :** थांबा ना—जरा थांबा—

**जयंता :** सोड मला—काय कटकट आहे तुझी !

**अंबू :** नाहीं सोडणार—अगोदर सांगा मला—आज अगदीं सोक्षमोक्ष करून घेणार आहें मी.

**जयंता :** तूं घे मोक्ष करून—मला कशाला बरोबर नेतेस ?— चल, सोड, जाऊं दे मला.

**अंबू :** मग सांगा मला, काय करणार आहां तुम्हीं माझं ?

**जयंता :** मी काय करणार ? तुला काय करायचं असेल तें कर तूं.

**अंबू :** मला लग्न करायचं आहे.

**जयंता :** मग कर.

**अंबू :** एकटी कसं करूं ? तुमच्या मागें मी आज सहा महिने आहें, नानातऱ्हांनीं तुमचं मन वळवायचा प्रयत्न करतें आहें—पण तुम्हीं माझ्याकडे नुसतं पाहायलादेखील तयार नाहीं.

**जयंता :** दुसरा कुणी पाहा. जगांत मीच कांहीं एकटा लग्नाचा उरलेलों नाहीं.

**अंबू :** पण माझ्या अण्णांनीं माझं तुमच्याशींच लग्न करायचं ठरवलंय्—म्हणून तर आज सहा महिने मला इथं तुमच्या घरीं आणून ठेवलंय्.

**जयंता :** कशाला ? मला वश करायला ?

**अंबू :** हो—अण्णा म्हणाले, मी सारखी तुमच्या डोळ्यांसमोर राहिलें म्हणजे तुम्हांला माझ्याबद्दल कांहींतरी वाटायला लागेल.

**जयंता :** हां—तिटकारा वाटायला लागला आहे ! काय वाटलं तुझ्या अण्णाला ? त्यांची बायको मरून चोदा वर्षे झालीं आहेत—आणि त्यापूर्वी दहा वर्षे त्यांचं लग्न झालं होतं—त्यामुळें लग्नाबद्दलचे त्यांचे चोवीस वर्षांपूर्वीचं अंदाज आतां टाकाऊ झाले आहेत म्हणावं !

**अंबू :** सहवासानं प्रेम नाहीं का जडत ?

**जयंता :** जडलेलं नाहींसं होतं आजकाल ! आतां शहाण्या माणसानं एक प्रेम तरी करावं, नाहींतर लग्न तरी करावं—दोन्हीं साधायचीं नाहीत !

**अंबू :** मग तुम्हीं यांपैकीं कुठलं करणार ?

**जयंता :** कुठलंच नाहीं.

अंबू : पाहा—आपणच म्हणतां, शहाण्या माणसानं एक प्रेम तरी करावं, नाहीतर लग्न तरी करावं—

जयंता : हो—पण ज्याला करायचं आहे त्याला. मला लग्न तर मुळींच करायचं नाहीं. आणि प्रेम—कशावर ग प्रेम करूं मी ? काय आहे तुझ्यांत म्हणून मी प्रेम करूं तुझ्यावर ? तुला कम्युनिझम म्हणजे काय माहीत आहे ? चिआंग—कै—शेक कुठं गेला माहीत आहे ? मार्क्सचं "कॅपिटल" किती पानांचं आहे पाहिलं आहेस ? सध्यां डॉलरचा भाव काय आहे ? कॉमनवेल्थमध्यें राहायचं कबूल करून कॉंग्रेसनं केवढी घोडचूक केली आहे—आहे माहित तुला ?—ऐकल्या आहेस कधीं या गोष्टी ? आणि लग्न करायला निघाली ! जा—तुझ्या अण्णांना म्हणावं, म्युनिसिपालिटीच्या शाळेंतला एखादा गायनमास्तर आणा जांवई म्हणून आणि बसा दोघेहि धैवत लावीत ! मी लग्न करायला मोकळा नाहीं. म्हणावं. [ जाऊं लागतो. ]

अंबू : [ त्याचा कोट धरून ] पण मी नाहीं जाऊं देणार तुम्हांला आज माझा निकाल लावा.

जयंता : निकाल लावला असता—पण श्रीमंतांनीं गरीबांना चिरडायचं—समर्थांनीं दीन दुबळ्यांना भरडायचं, याची आमच्या कम्युनिस्ट पार्टीला चीड आहे—म्हणून मी तुझी गय करतों आहे.

अंबू : म्हणजे तुम्हांला माझी दया येते ?

जयंता : हो—

अंबू : मग प्रेम कां नाहीं करीत ? निदान लग्न तरी कां नाहीं करीत ?

जयंता : हें बघ अंबे, लग्न कर म्हणून कुणी करीत नसतो. मला तुझ्याशीं लग्न करावंसं वाटत नाहीं. तूं तुझ्या अण्णांना सांग आणि परत आपल्या घरीं निघून जा कशी !

**अंबू :** इथं राहिलें म्हणून काय झालं? माझं आणि अण्णांचं रेशनकार्ड काढलं आहे—फुकट नाहीं कांहीं जेवीत मी!

**जयंता :** मग राहा—पण माझ्या मागचा तुझा पिंगा बंद कर.

**अंबू :** तुमचे भाऊकाकासुद्धां या लग्नाला तयार आहेत. लग्नानंतर आपला फोटोदेखील छापणार आहेत म्हणे ते आपल्या "ऐरावत" मध्यें.

**जयंता :** मग सध्यां तुझा छापायला सांग.

**अंबू :** एकटीचाच?

**जयंता** हो—म्हणावं फोटो छापा आणि खालीं "वर पाहिजे" असं लिहा. लग्न केल्यास जांवयाला जन्मभर सासरा गाणं फुकट शिकवील म्हणावं—जा.

[ जातो. अंबू हतबुद्ध होऊन थोडा वेळ दरवाजांतच उभी राहाते. दामुअण्णा—अंबूचा बाप—अंगात एक अघळपघळ कोट घालून व डोक्यावर पूर्वी घडीची पण आतां बाटोळी झालेली टोपी घालून माडीवरून येतात. येतांना ते खिशांतले चणे खात येतात. ]

**अण्णा :** काय अंबे, कुणाची वाट बघत आहेस? गेला वाटतं जयंता?

**अंबू :** आतांच गेले ते.

**अण्णा :** मग येवढ्यांत कसा येईल? आल्यावर त्याच्या आसपास राहात जा. अग, कष्टाशिवाय फळ नाहीं मिळत. चणे खावे लोखंडाचे! दहा दहा तास खांसाहेबांच्या घराच्या खालीं उभा राहायचा मी दोन पायांवर. केव्हां केव्हां वरून विड्याची चूळ टाकीत ती देखील पडायची अंगावर, म्हटलं, तरी हरकत नाहीं. अभिषेक होतो आहे हा आपल्यावर. तेव्हां ही विद्या साध्य झाली बरं. (कुठली तरी तान घेतात आणि उघडलेल्या तोंडांत शेंगदाण्याचा बोकणा भरतात.)

अंबू : पण हें गाणं नाहीं—नवरा आहे हा.

अण्णा : हं—मग अगदींच सोपं काम. संगीत विद्या म्हणजे असाध्य कला—सात जन्म नाहीं पुरायचे ती हस्तगत व्हायला. नवरा काय—हुं: !

अंबू : हो–हुं: ! सहा महिने होत आले इथं येऊन मला.

अण्णा : मी बारा वर्षे काढलीं खांसाहेबांकडे !

अंबू : आणखी बारा वर्षांनीं माझ्याकडे कुणी ढुंकून तरी पाहील ?

अण्णा : कांहीं नेम नाहीं सांगवत. आणखी कांहीं वर्षांनीं तिशीच्या पुढचीच जून मुलगी पाहायची फॅशन निघेल या पोरांची !

अंबू : हो, निघते आहे. सध्यां मात्र लग्न न करण्याचीच फॅशन निघाली आहे ! म्हणे कम्युनिझम माहीत आहे ? डॉलरची किंमत माहीत आहे ! जणूं काय लग्नाला कम्युनिझम् आणि डॉलर लागतो !

अण्णा : अग, वर्तमानपत्रवाल्याचा मुलगा आहे तो ! आणि तशांत कम्युनिस्ट ! रशियांत पाऊस पडला, कीं हे हिंदुस्थानांत छत्र्या उघडायचे !

अंबू : पण आतां किती दिवस मी त्यांची मनधरणी करीत राहूं ? मला तर बाई कंटाळा आला आहे.

अण्णा : जरा दम धर—अशी एकेरीवर येऊं नकोस.

अंबू : हो—तुम्हांला काय झालं सांगायला ? म्हणे दम धर. आतां दम शिल्लकच उरला नाहीं. तुम्हीं भाऊकाकांना तरी सांगून पहा.

अण्णा : बा:, मधून मधून सांगतोंच आहें कीं मी. पण परवांच बापलेकांची जुगलबंदी झाली आहे—तेव्हां सध्या दोघांपैकीं कुणाच्याच वाटेला जाण्यांत अर्थ नाहीं.

अंबू : खरंच अण्णा—कशाबद्दल भांडत होते हो दोघे ? मला तर अक्षरदेखील कळलं नाहीं.

अण्णा : आणि त्यांना तरी कुठं कळलं आहे ? काय म्हणे, हिंदुस्थान कॉमनवेल्थमध्यें राहिला ही कॉंग्रेसनं घोडचूक केली कीं शहाणपणा केला !

बाप म्हणतो, शहाणपणा केला; आणि पोरगा म्हणतो, गाढवपणा केला! असे शिरा ताणून भांडत होते दोघेही, कीं कुणाला वाटावं, हिंदुस्थानचं बरंवाईट होणं आतां या दोघांच्या निकालावरच अवलंबून आहे! अखेर हिंदुस्थान राहिला तिथंच आणि पोराची घराबाहेर पडायची भाषा सुरू झाली.

अंबू : म्हणजे ते जाणार आहेत कीं काय इथून?

अण्णा : कसला जातो ग? नुसती धमकी देऊन पाहिली त्यानं. खाणार काय बाहेर जाऊन? हे कम्युनिस्ट म्हणजे नाहीं तिथले भुकेकंगाल!

अंबू : वा:, बी. ए. झाले आहेत ते.

अण्णा : म्हणूनच म्हटलं मी! जितकं शिक्षण जास्त तितका पोटाचा प्रश्न बिकट! नुसता गांवभर हिंडत असतो. कम्युनिस्ट म्हणे! काय करतो आहे कुणाला ठाऊक कम्युनिस्ट होऊन. टोपीचा खर्च वांचवला आहे बापाचा!

अंबू : मग कशाला असल्या जांवयासाठीं धडपड चालली आहे तुमची?

अण्णा : मग इतका स्वस्त जांवई पाहू कुठं दुसरीकडे? अग, ह्या लग्नाला पैचा खर्च करायला नको मला. दुसरा जांवई पाहायचा तर त्याला देणार काय? हजार बाराशें चिजा आहेत काय त्या माझ्याकडे. त्या घेऊन का तुला कोणी पदरांत घेणारा मिळणार आहे? इथं हणमंताच्या जुन्या दोस्तीचा फायदा घ्यायला हवा मला.

अंबू : मला नाहीं वाटत, या घरांत मला कायम राहायला मिळेल म्हणून! त्यांना तर मी अगदीं डोळ्यांसमोर नको.

अण्णा : अग, वर्तमानपत्रवाल्याचा पोरगा! वर्तमानपत्रवाल्यांचीं मतं कुठं कायम टिकत असतात? आज म्हणतील, हिंदुस्थान स्वतंत्र व्हायला हवा, उद्यां म्हणतील ब्रिटिशांचं राज्यच बरं होतं! आजच्या अंकांत

नागरिक स्वातंत्र्यासाठीं सात कॉलम खरडतील, उद्यां अमुक संस्थेवर बंदी घालण्याचा सरकारला आग्रह करतील. आज तुझ्याकडे पाहायला तयार नाहीं तो—उद्यां तुझ्याभोंवतीं सारखा पिंगा घालीत राहील.

**अंबू :** [ खोल्या आशेनें आनंदून ] खरंच अण्णा ?

**अण्णा :** पहा तर खरी. धीर सोडूं नकोस म्हणजे झालं.

**अंबू :** सोळा सोमवार करीन तुमचं म्हणणं खरं झालं तर, अण्णा.

**अण्णा :** एक देखील करूं नकोस. अग, सोमवार आणि शनिवार करून कुठं नवरा मिळत असतो होय ? वारावर नवरे मिळायचे दिवस गेले आतां. आतां मिळेल तो दिवस आणि मिळेल ती रात्र. टपून राहिलं पाहिजे तुम्हां पोरींना ! कुठल्या क्षणाला तो गाफिल परिस्थितींत सांपडेल, याचा नेम नाहीं. तो क्षण साधला, कीं तो मुठींत आलाच समज ! अग, नवरा नवरा काय घेऊन बसली आहेस ! नवरा म्हणजे काय "नोम तोम" नव्हे, कीं एखाद्या फैय्याजखांलाच साधेल !

**अंबू :** तुमच्या बोलण्यानं किती हुरूप आला आहे म्हणून सांगूं मला अण्णा !

**अण्णा :** मग आगे बढो—आगे दौडो—[ असें म्हणत चणे खात जातात. अंबू नवीन अंकुर फुटलेल्या आशेनें प्रफुल्लित होऊन गाणें म्हणते. ]

**अंबू :**—

येईल कां कधीं जीवनीं माझ्या ।
शुभमंगल घटिका ॥
युगांयुगांची एकच आशा ।
सुफलित होईल का ॥ धृ ० ॥
नवखंडांतुनी धुंडुनि आणुनी ।
अर्पिन कौस्तुभमाळा ॥
फुलविन त्रिभुवन सुस्वरनादें ।
छेडुनी हृदयाला ॥ १ ॥

[ गाणें संपण्याच्या सुमारास कल्याणी आणि तिच्या मागून डोकीवर एक बेडिंग आणि बॅग घेऊन हमाल येतो. ]

**कल्याणी** : ठेव. [ हमाल सामान ठेवतो. ती पर्समधून त्याला पैसे देते. तो जातो. कल्याणी इकडे तिकडे पाहाते. अंबूकडे लक्ष जाऊन ] कुठं गेला जयंता ? आहे का माडीवर ?

**अंबू** : बाहेर गेले आहेत.

**कल्याणी** : मग घरांत कोण आहे ? त्याचे भाऊकाका—

**अंबू** : नाहींत—कुणी नाहीं. मीच आहें एकटी.

**कल्याणी** : हो का ? मग द्या मला पाणी तोंड धुवायला. आणि चहाही करा थोडा. [ खुर्चीवर आरामानें बसत ] त्या बेडिंगमधला टॉवेल काढतां का जरा ?

**अंबू** : [ तिच्याकडे पाहात ] मला कोण समजलां तुम्ही ? स्वयंपाकीण कीं मोलकरीण ?

**कल्याणी** : मग मी काय समजावं अशी इच्छा आहे तुमची ? बायको ? [ हंसते. ]

**अंबू** : हंसायला काय झालं ?

**कल्याणी** : जयंताचं अजून लग्न झालं नाहीं, हें माहीत आहे मला.

**अंबू** : म्हणूनच आलां आहांत वाटतं ?

**कल्याणी** : अगदीं त्याची बायको असल्यासारखंच मत्सरानं बोलतां ! बेत आहे वाटतं ? विचारलं पाहिजे चोराला अशी भांडवलशाही केव्हांपासून करायला लागलास ? [ बॅग उघडून त्यांतला टॉवेल काढते. ]

**अंबू** : इथंच राहायला आलां आहांत वाटतं ?

**कल्याणी** : हं. चालेल ना ? [ हंसते. अंबू गांगरते. ] खरंच, तुम्ही कोण हें विचारायचं राहिलंच.

**अंबू :** बरीच लवकर आठवण झाली म्हणायची ! नाहींतर हें बेडिंग आणि बॅग उचलून गाडीवर नेऊन ठेवायला सांगितल्यावर आठवण व्हायला हवी होती तुम्हांला !

**कल्याणी :** म्हणजे माझी सोय माडीवर केली आहे वाटतं ? बरं झालं कळलं तें ! [ बॅग घेऊन जिन्याजवळ जाऊं लागते. ]

**अंबू :** हें पहा, घरांत कुणी नाहीं—

**कल्याणी :** तुम्हीं आहांत कीं !

**अंबू :** हो--पण घरांतल्या माणसांपैकीं कुणी आलं म्हणजे जा वर.

**कल्याणी :** अस्सं अस्सं. म्हणजे तुम्हीं घरांतल्या कुणी नव्हत तर ! आणि मघांपासून चांगलीच मालकशाही गाजवीत होतां कीं ! बरं झालं बाई ! म्हटलं, तुमचा सासुरवास होणार आहे कीं काय मला इथं असेंपर्यंत ! —केव्हां जाणार आहां ?

**अंबू :** मी जाणार नाहीं. तुम्हीं केव्हां जाणार आहां तें सांगा.

**कल्याणी :** येऊन दहा मिनिटंदेखील झालीं नाहींत मला अजून--

**अंबू :** तुम्हीं येणार हें माहीत तरी आहे का कुणाला ?

**कल्याणी :** छे:— मी कळवलंच नव्हतं जयंताला. तो चोर तरी कधीं कळवतो का मुंबईला येतांना ! दत्त म्हणून आपला उभा दारांत.

**अंबू :** म्हणजे हे मुंबईला जातात तेव्हां--

**कल्याणी :** [ तिचें वाक्य पूर्ण करीत ] माझ्याकडेच उतरतात !--चार-आठ दिवस राहातात--आणि--आणखी कसली माहिती पाहिजे तुम्हांला ?

**अंबू :** कांहीं नको. आलं लक्षांत सारं माझ्या.

**कल्याणी :** मोठ्या धूर्त आहां तुम्हीं. नाहींतरी आपण बायका पुरुषांपेक्षां धूर्तच असतों, नाहीं ? खरंच, देशाचं राजकारण चालवण्याशाठीं मंत्रि-मंडळांत बायकांना कां घेत नाहींत-कळत नाहीं ! आपण चूल आणि मूल

सोडून आतां राजकारणाच्या आखाड्यांत उतरलं पाहिजे. इतकीं वर्षं चुलींत आणि मुलांत गुंतवून या पुरुषांनीं आपल्याला खूप बनवलं आहे. तुमचं काय मत आहे ?

**अंबू :** मला नाहीं कांहीं कळत.

**कल्याणी :** पण खरंच, तुम्हीं कुणाच्या कोण ?

**अंबू :** मी आमच्या अण्णांची मुलगी आहे.

**कल्याणी :** मग इथं जयंताच्या घरीं कशाला आलांत ?

**अंबू :** तुम्हीं कशालां आलांत ?

**कल्याणी :** मी होय ?—मी—सहज आले.—पण तुम्ही कांहीं सहज आलेल्या दिसत नाहींत. तुमच्या गळ्यांत मंगळसूत्रही दिसत नाहीं.

**अंबू :** तुम्हांला कशाला उठाठेव दुसऱ्यांच्या मंगळसूत्राची ? तुम्हीं आपला गळा पहा अगोदर.

**कल्याणी :** आमच्या जातींत तुम्हां ब्राह्मणांसारखीं लग्नं होत नाहींत मंगळसूत्र घालायला. लग्नाचं ढोंग तुम्हां ब्राह्मणानींच करावं. आम्हीं ढोंगी नाहीं तुमच्यासारखे !

**अंबू :** आम्हीं ढोंगी !

**कल्याणी :** नाहीं का ? तुमचे लग्न झालेले ब्राह्मण पुरुष आपल्या बायकांखेरीज दुसऱ्या बायकांच्या वाऱ्याला फिरकतच नाहींत, असं वाटतं कीं काय तुम्हांला ? आमच्या जातींत असल्या पुरुषांची केवढी तरी यादी सांपडेल घरोघर. आणि तुम्हीं त्यांच्या बायका ! नवऱ्याचा हा छंद माहीत असूनदेखील त्याच्या नांवानं गळ्यांत मंगळसूत्र घालून ऐटीनं मिरवतां !—म्हणजे पुरुष एक ढोंगी तर तुम्हीं त्यांच्या बायका सात ढोंगी !

**अंबू :** [ डोक्यांत कसला तरी प्रकाश पडून ] अस्सं ! म्हणजे तुम्हीं त्या जातींतल्या आहां !—आणि तुमच्या घरीं—

**कल्याणी** : [ मध्येंच ] जयंता आठआठ दिवस राहातो !—आतां तो आला कीं गोमुत्र शिंपडा त्याच्या अंगावर !—जमलं तर पाजाही थोडं त्याला !

[ हंसते. अंबू फणकाऱ्यानें निघून जाते. कल्याणी तिच्याकडे पाहून मोकळेपणानें हंसते. नंतर एकंदर जागेचें, भिंतीला लटकाविलेल्या फोटोंचें, टेबलावरील सामानाचें निरीक्षण करीत गाणें म्हणते व शेवटीं टेबलाजवळच्या खुर्चीवर बसून कागदपत्र चाळते. ]

**कल्याणी :—**

दे मज देवा जन्म हा ।
भासें जरी मी पतिता कुणा ॥ धृ० ॥
असुनी कलंकित अंतरीं अपुल्या
मिरविती कां हे व्यर्थचि कुलशीला ॥ १ ॥

**हणमंतराव** : [ बाहेरून मोठमोठ्यानं बोलत येत ] हरामखोर ! माझ्या० विरुद्ध कामगारांना फितवतो !—आणि म्हणे हा मुलगा ! चांगला झोडपून काढला पाहिजे हरामखोरा—[ अंगातले कपडे काढून टेबलाकडे येतात आणि कल्याणी खुर्चीवर बसलेली पाहून एकदम थांबतात. कल्याणी उठून उभी राहाते. ] कोण तूं ? मला वाटलं अंबू कीं काय ?

**कल्याणी** : तिच्या मानेवर केसांचा बुचडा आहे—

**हणमंत** : हो—तुझ्या मानेवर तोहि दिसत नाहीं. कोण तूं ? कुणाकडे आलीस ?

**कल्याणी** : जयंताकडे. कुठं आहे तो ?

**हणमंत** [ एकदम उसळून ] तो कोकलतो आहे माझ्या छापखान्यांतल्या कामगारांपुढं !

**कल्याणी** : कां—संपावर गेले आहेत ते ?

**हणमंत :** गेले नाहींत—हा घालवायला पाहातो आहे हरामखोर!—पण तूं कोण ?

**कल्याणी :** त्या हरामखोराची मैत्रीण !

**हणमंत :** मैत्रीण ! पहा—आतां याचं लग्न करायच आहे आणि याला म्हणे मैत्रीण आहे ! आहे कीं नाहीं ?

**कल्याणी :** पहा म्हणजे झालं ! पूर्वीच्या पिढींतले पुरुष आपल्या बायको-खेरीज दुसऱ्या कुणा स्त्रीकडे ढुकूनदेखील पाहात नसत, नाहीं ?

**हणमंत :** [ किंचित गांगरून ] असंच नाहीं कांहीं म्हणत मी. पण हे स्वतःला कम्युनिस्ट म्हणवतात आणि यांचे हे धंदे चालतात !

**कल्याणी :** [ हंसून ] यांत कसला धंदा करताहेत ते? कॉलेजांत आम्ही बरोबर शिकत होतों—फ्रेन्ड्स् आहों आम्ही.

**हणमंत :** फ्रेंड्स? एक वयांत आलेला तरुण आणि दुसरी वयांत आलेली तरुणी यांची मैत्री! ह्या ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं काय काय खुळं आणून सोडलीं आहेत या भारतवर्षांत !

**कल्याणी :** आतां ब्रिटिश राज्य आहे कुठं ! आपलंच देशी सरकार आलं आहे ना ?

**हणमंत :** म्हणून काय दीडशें वर्षांचे त्यांचे संस्कार जाणार आहेत आपल्यावरचे ? छेः छेः छेः—पण तूं आलीस कुठून ?

**कल्याणी :** मुंबईहून.

**हणमंत :** [ सामानाकडे पाहून ] म्हणजे इथंच उतरायला आली आहेस वाटतं ? वाः, छान.

**कल्याणी :** तुमची इच्छा नसली तर जातें एखाद्या हॉटेलांत.

**हणमंत :** छेः छेः आतां आलीच आहेस तर राहा. आम्हांलाही कांहीं आदरातिथ्य, माणूसकी आहे. आम्ही अगदींच कम्युनिस्ट झालों नाहीं अजून !

**कल्याणी :** तुमचा कम्युनिस्टांवर भारी राग दिसतो !

**हणमंत :** मोठी हरामखोर जात आहे ! मोडतोड, जाळपोळ, घातपात हाच त्यांचा उद्योग. कांहीं बरं करतील म्हणावं तर शपथ; वाईट मात्र हवं तेवढं करतील. यांच्या हातांत आगपेटी द्या—देवापुढचं निरांजन पेटवायचे नाहींत—घराला आग लावतील !—आणि तूं त्या हराम-खोराची मैत्रीण !—फ्रेन्ड ! सांग त्याला चार समजुतदारपणाच्या गोष्टी. चांगलं लग्न करून संसार करायचं हें वय—रेशानिंग इन्स्पेक्टरची नोकरी लावून देणार होतों त्याला बी. ए. झाल्याबरोबर !—पण यांच्या डोक्यांत जाळपोळीचे आणि घातपाताचे विचार चाललेले ना ! यांना सुखानं कुठं नोकरी करायला हवी ! बरं झालं त्याची आई नाहीं जिवंत हा पोराचा सोहळा पाहायला.

**कल्याणी :** लग्न झाल्यावर थंड होईल माथं त्याचं !

**हणमंत :** पण तें तरी कुठं करतो आहे ? तो दामुअण्णा आपल्या पोरीला घेऊन राहिला आहे सहा महिने आज इथं मुक्काम ठोकून. म्हटलं पोरगी डोळ्यापुढं राहिली सारखी म्हणजे विरघळायचा एखाद दिवशीं—

**कल्याणी :** विश्वामित्रासारखा !

**हणमंत :** पण हा विश्वामित्राचा बाप होऊन बसलाय् ! ती पोरगी तर अगदीं मेटाकुटीला आली आहे !

**कल्याणी :** तिला खाडिलकरांचं "मेनका" नाटक आणून द्या, म्हणजे थोड्या 'टिप्स्' मिळतील !

**हणमंत :** अग, कसल्या 'टिप्स्' घेऊन बसली आहेस ! असेल तिच्या नशिबांत तर होईल ! त्याला घोड्याच धरून बांधून उभा करतां येणार बोहल्यावर !

**कल्याणी :** आणि एकदां केला, तरी जन्मभर घोड्याच पंढरीच्या विठोबा-सारखा कटेवर हात ठेऊन विटेवर उभा रहाणार आहे तो ! आधींच

पुरुषांची जात—आणि त्यांत मनाविरुद्ध लग्न झालेलं असलं कीं झालंच! बारा गांव पालथे घालायचं 'लायसन्स'च मिळालेलं!

**हणमंत :** तुझ्यावर तरी कॉलेजांत प्रेमबिम केलं का त्यानं?

**कल्याणी :** [ हंसून ] छे!—मला वाटतं, ह्या कम्युनिस्ट लोकांच्या अंतःकरणांत प्रेम, माया, दया, शांति असल्या कोमल भावनाच नसतात. लग्नबंधनाच्यादेखील ते विरुद्ध आहेत म्हणे!

**हणमंत :** हो—यांना बंधनं नकोत—कबुतरासारखं घुमायला पाहिजे! पूर्वीचीं तीं हिंदुशास्त्राप्रमाणं होणारी धार्मिक विधींचीं लग्नं नकोत यांना! ते वैदिक विधी झाले, रजिस्टर्ड लग्नं झालीं—आणि आतां काय म्हणे, मुदतीचीं लग्नं करायचे चाळे चालले आहेत विलायतेंत! हां हां म्हणतां आमचे हे रशियाचे दलाल इथं हिंदुस्थानांत आणायचे हा माल! काय एक एक खुळं माजवलीं आहेत! त्या नेहरूंची सत्ता एक दिवस माझ्या हातांत कुणीं दिली तर असा फोडून काढीन चाबकानं एकेकाला!

**कल्याणी :** पण जवाहरलालही म्हणे ह्या जुन्या चालीरीतींच्या विरुद्ध आहेत.

**हणमंत :** मग, कितीही असला तरी तो नेहरूंचा बच्चा आहे! नेहरूंचं घराणं म्हणजे असंतसं नव्हे! चांगलं खानदानी आणि घरंदाज! त्यांचीं मतंही तशींच खानदानी असायचीं! असलीं वेडं नाहींत त्याच्या डोक्यांत. नाहींतर केव्हांच गाशा गुंडाळावा लागला असता त्याला. पण तूं कांहीं चहाबिहा घेतलास का?

**कल्याणी :** कोण देणार?

**हणमंत :** अंबू नाहीं का घरांत!

**कल्याणी :** ती तर मला विचारूं लागली, केव्हां जाणार परत म्हणून!

**हणमंत :** [ हंसून ] असं, असं! म्हणजे तिला वाटलं—

**कल्याणी :** [ मध्येंच ] मी इथं कायमची राहायला आलें आहे ! म्हणजे तिचे " चान्सिस " गेलेच !

**हणमंत :** हो—ती भीति आहेच.

**कल्याणी :** तुम्हांलाही वाटते ?

**हणमंत :** छेः छेः—म्हणजे माझं म्हणणं असं, कीं, तुझ्यापुढं अबू त्याच्या डोळ्यांत भरणं जरा मुष्कील ! पोरगी अगदीं जीव टाकते त्याच्यावर—तेव्हां तिच्या मार्गांत विघ्न येऊं नये ! मला काय—कुठूनही त्याच्या पायांत बायकोची बेडी पडली म्हणजे झालं. त्याशिवाय तो वठणी-वर नाहीं यायचा. एकदां लग्न झालं कीं, कम्युनिस्टाचा नेमस्त झालाच समजा !

**कल्याणी :** एकंदरींत लग्नामुळं माणूस नेभळट बनतो तर ! म्हणूनच मला वाटतं, कांहीं कांहीं ठिकाणीं विवाहसंस्था नष्ट करण्याचे प्रयत्न चालले आहेत.

**हणमंत :** वाः—असंच नाहीं कांहीं. लग्न हें श्वासोच्छ्वासासारखं अवश्य आहे प्रत्येक स्त्रीपुरुषाला.—तुझं झालं कीं नाहीं ?

**कल्याणी :** अंहं.

**हणमंत :** लवकर करून टाक. लग्नाशिवाय राहूं नको. [ आंतल्या खोली-कडे पाहून ] अंबू, चहा घेऊन ये.—लग्नाशिवाय पुरुषांनीं राहूं नये—आणि बायकांनीं तर मुळींच राहूं नये.

**कल्याणी :** लग्नाशिवाय राहणाऱ्या बायकांची जात आहे कीं आपल्या-इकडे. त्यांचीं लग्नं होत नाहींत, तरी त्यांचा वंश वाढतोच आहे !

**हणमंत :** म्हणजे त्या वेश्या म्हणतेस होय ?—शीः— कसलं जिणं त्यांचं तें ! समाजाला एक मोठं लांछन आहे तें !

**कल्याणी :** कां—तुम्हां पुरुषांची सोय करतात ना त्या ? केवढं मोठं सामाजिक कार्य म्हटलं पाहिजे हें !—निदान तुम्हां पुरुषांनीं तर त्यांचा

या कार्याबद्दल गौरव केला पाहिजे. तुम्हीं वेश्यांची घरं वर्ज करा पाहूं—त्यांचा अवतार क्षणांत समाप्त होईल.

**हणमंत :** म्हणजे आम्हीं त्यांना वेश्याव्यवसाय कराकला लावतों असं तुझं म्हणणं ?

**कल्याणी :** मग काय स्त्रियांसाठीं त्या हा व्यवसाय करतात ? [ हंसते ]. तुम्हीं पुरुष सज्जन आणि सच्छिल असतां, तर वेश्यांची कोण उपासमार झाली असती ! तुम्हीं वास्तविक "वेश्या-गौरव खास अंक" काढायला हवा ! [ हंसत सुटते. ]

**हणमंत :** छान—म्हणजे लोकांना माझी चेष्टा करायला साधन झालं ह्या म्हातारपणीं !

**कल्याणी :** लोक चेष्टा करीत नाहींत कशाची ? अहो, सरकार दारूबंदी करतं आहे, त्याचीही नाहीं नाहीं ती चेष्टा चालली आहे !

**हणमंत :** मूर्ख आहेत लोक ! काँग्रेस सरकार करतं आहे तें आपला नीतिमत्ता सुधारावी म्हणूनच करतं आहे. नुसतं राजकारण केलं म्हणजे भागलं नाहीं; आधीं लोकांची नीतिमत्ता सुधारली पाहिजे. स्वतत्र राष्ट्रांतले लोक आपापल्या इच्छेप्रमाणं वागूं लागले तर असलं राष्ट्र स्वतंत्र होऊन काय फायदा ! आधीं राष्ट्राचा कणा मजबूत झाला पाहिजे. झक् मारतं तें राजकारण ! आधीं लोकांची नीति सुधारली पाहिजे !

**कल्याणी :** तुमचाही नीतीवर एवढा विश्वास आहे ?

**हणमंत :** मग काय मला कम्युनिस्ट समजलीस ? अस्सल काँग्रेसवाला आहें मी; ब्र काढणार नाहीं तोंडून सरकारविरुद्ध प्राण गेला तरी !

**कल्याणी :** सरकार चुकत असलं तरी ?

**हणमंत :** सरकार कधीं चुकत नसतं. मी म्हणतों—[ अंबू चहा घेऊन येते. ] उद्यां सरकारनं लोकांची प्रकृति सुधारण्यासाठीं चहा पिण्यावर बंदी

घातली, तर त्याचाहि मी माझ्या "ऐरावत" मधून जोराचा पुरस्कार करीन.—घे, छान चहा करते आमची अंबू.

**कल्याणी :** आणि स्वयंपाक?

**हणमंत :** तोहि झकास करते. पाहाशीलच तूं आतां.

**कल्याणी :** धुणंभांडं, शिवणटिपण, केरकचरा काढणं, दाढीचा ब्रश धुवून पुसून ठेवणं—यांतही तरबेज असेल!

**अंबू :** हो—हो—आहे बरं, काय म्हणायचं आहे तुम्हांला?

**कल्याणी :** नाहीं—म्हणजे—म्हणायचं इतकंच, कीं लग्नाला लागणारी सगळीं सर्टिफिकेटं आहेत तुमच्याजवळ. जयंतानं "हो" म्हणायला कांहींच हरकत नाहीं!

**हणमंत :** आतां आलीच आहेस तूं—तर एवढं जमवून जा.

**अंबू :** त्या कसल्या जमवणार? जमत असलं तर मोडतील!

**कल्याणी :** छेः छेः— तुझ्यासारखं एकदेखील सर्टिफिकेट नाहीं माझ्यापाशीं! मी कशाला तुमचं जमणारं लग्न मोडूं?

**अंबू :** मग मघां कऱ्या म्हणालांत, कीं आल्याबरोबर विचारायला हवं त्याला "अशी भांडवलशाही केव्हांपासून करायला लागलास?"

**कल्याणी :** मग? बरोबरच आहे. दुसऱ्याची मुलगी बळकावून स्वतःची मालमत्ता म्हणून वापरणं, ही भांडवलशाही नाहीं? का हो भाऊकाका?

**हणमंत :** माझं नांवही तुला माहीत दिसतं!

**कल्याणी :** जयंताच्या बोलण्यांत तुमचा उल्लेख येतो ना नेहमीं.

**हणमंत :** मुंबईला तुझ्याकडेच उतरतो कीं काय?

**अंबू :** हो—आणि आठ आठ दिवस राहातात म्हणे!

**हणमंत :** आणखी कोण घरांत आहे तुझ्या?

**कल्याणी :** घरांत होय?—मी आणि माझी आई.

**हणमंत :** आणखी? पुरुष माणूस?

**कल्याणी :** माझ्या जन्मापूर्वी येत असत म्हणे! आतां कुणी नाहीं येत.

**हणमंत :** आणि तुझा बाप?

**कल्याणी :** बाप? [ हंसत सुटते. ]

**हणमंत :** [ गांगरून ] अं! हंसायला काय झालं तुला?

**कल्याणी :** [ अजूनही हंसत ] हंसू नको तर काय करूं? अहो भाऊ-काका, आम्हांला फक्त आई असते!

**हणमंत :** म्हणजे तूं—त्या यांपैकीं—

**कल्याणी :** हो हो—त्या यापैकीं—म्हणजे समाजाला ज्यांच्यामुळं लांछन लागतं म्हणतात—पण ज्यांच्यामुळं तुम्हां पुरुषांची वेळीअवेळीं सोय होते —त्यांपैकीं! आतां सांगा, माझ्या बापाचा पत्ता लागणार कसा?

**हणमंत :** हरे राम!—आणि तुझ्या घरीं जयंता आठ आठ दिवस राहातो?

**कल्याणी :** हो.—नाहींतर पूर्वी कोणी येत ते आमच्याकडे कधीं राहात म्हणून नसत! महालफंगे!

**हणमंत :** तुझा बापही त्यांपैकींच दिसतो!

**कल्याणी :** हो ना! माझा जन्म झाल्यावर तो जो बेपत्ता झाला तो आतां—

**हणमंत :** परत आला कीं काय?

**कल्याणी :** छेः—कसचा येतो! मोठा लब्धप्रतिष्ठित माणूस आहे तो! तो उजळ माथ्यानं कसा येऊन सांगेल, कीं कल्याणी, हा पाहा तुझा बाप तुझ्यापुढं उभा आहे!—छेः—असं कधीं सांगून चालेल! मग त्याचा प्रतिष्ठितपणा तो काय राहिला? त्याची सामाजिक नीतिमत्ता ती काय राहिली? त्यामुळं बापाला बाप म्हणायचीदेखील पंचाईत आहे मला.

**हणमंत :** जयंताला माहीत आहे का हें सारं?

**कल्याणी** : तर! म्हणून त्याला आमच्याबद्दल फार सहानुभूति वाटते म्हणे! आई तर तो आला म्हणजे इतका कांहीं जीव टाकते त्याच्यावर! त्याला आई नसल्यामुळं माझ्या आईलाच तो आई म्हणून हांक मारतो.

**अंबू** : आणि तुम्हांला ताई म्हणतो का आक्का!

**कल्याणी** : छेः छेः, मी तसलं त्याला कांहीं म्हणूं देत नाहीं.

**अंबू** : बरोबरच आहे — कसं म्हणूं द्याल! अडचण होईल ना त्यांची मग!

**कल्याणी** : [ हंसत ] अहो, नुसतं आक्का न् ताई म्हणून व्हायचं तें थोडंच टळणार आहे! पुरुष एकदां नादीं लागले, कीं ते सारं विसरतात!

**अंबू** : पण सगळयांनाच कला साधत नाहीं पुरुषांना नादीं लावायची!

**कल्याणी** : छेः छेः छेः—प्रत्येक स्त्रीला ही कला साध्य असायलाच हवी. आपल्याला हवा तो पुरुष मिळवला, तरच ती खरी स्त्री!

**हणमंत** : अग, तो काय लिलांव आहे, कीं आंकडा वाढवून हवी ती वस्तु खरेदी करतां येईल!

**कल्याणी** : मी देऊं का यांना धडे!

**हणमंत** : हो—तुझ्या जातींतल्या मुली मोठ्या तरबेज असतात या कलेंत.

**कल्याणी** : तुम्हीं केव्हां पाहिल्या!

**हणमंत** [ गांगरून ] छेः छेः—तें "संशयकल्लोळ" नाटक पाहिलं होतं एकदां. त्यांतली ती रेवती—

**कल्याणी** : कलावंतीण असूनदेखील गृहस्थाघरची बायको वाटते, नाहीं?

**हणमंत** : हंः —तें आपलं नाटककारानं रंगवलं आहे कांहीतरी. कलावंतिणी त्या कलावंतिणी!

**कल्याणी** : माझ्याबद्दल काय म्हणाल तुम्हीं!

**हणमंत** : तूं तशी ठीक दिसतेस. पण काय नेम! तुम्हीं मोठ्या वस्ताद असतां!—

**कल्याणी** : बी. ए. झालें आहें मी !

**हणमंत** : हो का ? अरे वा: ! बऱ्याच सुधारल्या म्हणायच्या मुली तुमच्या !

**कल्याणी** : तुमच्या वेळीं अगदींच अशिक्षित होत्या, नाहीं ?

**हणमंत** : आमच्या वेळीं ? म्हणजे ?

**कल्याणी** : म्हणजे--तुम्हीं तरुण होतां--जयंताएवढे—त्यावेळीं नाहीं झाली तुमची ओळख कुणाशीं ?

**हणमंत** : छे: छे:—

**कल्याणी** : तुमच्या वेळचे तरुण घाबरत असत, नाहीं ?--आतां जयंता पहा ना--कसा अगदीं उघडपणें येऊन राहतो आमच्या घरीं आठ आठ दिवस.

**हणमंत** : मोठीं निर्लज्ज झालीं आहेत पोरं !

**कल्याणी** : हो--पूर्वीं तुमच्या वेळीं कसे लपूनछपून आमच्या घरांत शिरायचे पुरुष !--आतां लाजाच सोडल्या आहेत त्यांनीं !

**हणमंत** : [ तिच्या बोलण्यांतला गार्भितार्थ जाणून ] बरं--बरं--चल, हातपाय धू.—अंबू, सदूला सामान वर नेऊन ठेवायला सांग.

**अंबू** : म्हणजे इथंच राहाणार या ?

**कल्याणी** : नाहीं अंबाबाई, जातें मी.—भाऊकाका, माझें सामान बाहेर काढा. तुमच्या ह्या भावी सुनबाई घरांत कुणा बाईमाणसाला थारा द्यायला म्हणून तयार नाहींत.

**हणमंत** : अग अंबे, आतां ती आली आहे, तर राहूं दे. ती कांहीं कायमची राहायला आली नाहीं. [ अंबू पाय आपटीत जाते. ]

**कल्याणी** : हो—काम झालं कीं लगेच स्टेशन गांठीन.

**हणमंत** : हो--खरंच, तुला विचारायचं राहिलंच. कसल्या कामाला आली आहेस तूं ?

**कल्याणी** : बा:—माझा बाप म्हणे इथं राहातो.

हणमंत : इथं—या पुण्यांत!

कल्याणी : हो, हो—ह्या पुण्यांत! जिथं "केसरी" निघतो, जिथं संस्कृति-संरक्षक मंडळ आहे, जिथं नाक्यानाक्यावर मारुती आहेत आणि जिथं दत्तो वामन पोतदार राहतात त्या या पुण्यांत! नुकताच मला पत्ता लागला. म्हटलं, बघून घ्यावा एकदां. तो नाहीं मला मुलगी मानायला तयार व्हायचा—पण मी तरी एकवेळ त्याला "बाबा" म्हणून हांक मारीन. "ओ" दिली त्यानं तर ठीक—नाहींतर धरला रस्ता पुन्हां आईच्या घराचा.

हणमंत : अस्सं. नांव काय त्याचं?

कल्याणी : नांव?—का—तुम्हीं ओळखाल!

हणमंत : कदाचित् माहीत असायचं मला. पंधरा—वीस वर्षं पुण्यांतच राहातोंय्—गेलेलं असायचं नांव कानावरून. कोण आहे तो?

कल्याणी : मोठा माणूस आहे तो! नेहमीं नांव झळकतं त्याचं वर्तमान-पत्रांतून.

हणमंत : अरेच्चा! खरं कीं काय? मग मला नक्कीच माहीत असेल! सांग—सांग कोण तो?

कल्याणी : नको बाई! फार मोठा माणूस आहे तो! लोक त्याला मोठा प्रतिष्ठित समजतात. उगाच त्याच्या नांवावर शिंतोडे उडायचे—किती झालं तरी मला जन्माला घातलं आहे त्यानं. त्याच्या अब्रूला किंवा प्रतिष्ठेला डाग लागलेला मला कसा आवडेल? अहं—मी नाहीं सांगणार.

हणमंत : अग, पण कुठल्या पक्षाचा आहे? हिंदुसभेतला का कम्युनिस्ट का सोशालिस्ट—आहे तरी कुठला?

कल्याणी : वर्तमानपत्र आहे तुमचं म्हणून विचारतां वाटतं? वरीं आपलीं त्याचीं अंडींपिल्लीं काढतां येतील, नाहीं? पण खरं सांगूं का, तो आहे तुमचा कॉंग्रेसवाला!

**हणमंत :** काय म्हणतेस ! कॉंग्रेसमध्यें असला माणूस !

**कल्याणी :** अहो भाऊकाका, क्षेत्रांतच जास्त घाण असते ! काशी, प्रयाग, पंढरपूर येथें जाऊन आलेलीं माणसं तर म्हणतात, इतकी घाण दुसरीकडं कुठं सांपडायची नाहीं. पापी माणसं आपलं पाप तिथं धुवून टाकतात ना, तेव्हां तिथं ही घाण सांचते !

**हणमंत :** अशा कांहीं गोष्टी ऐकल्या, कीं आम्हांला शरमेनं मान खालीं घालायला लागते.

**कल्याणी :** छेः छेः, एवढं नका मनाला लावून घेऊं. जन्माला आले तेव्हां कांहीं तो कॉंग्रेसवाला नव्हता. नंतर पश्चात्तापानं कॉंग्रेसमध्यें गेला म्हणे !

**हणमंत :** हं—मग बरोबर ! तरी म्हणलं, शुभ्र खादीच्या आंत असलं काळं अंतःकरण कसं असेल ?

**कल्याणी :** का—कॉंग्रेसवाल्यांना इतर माणसांसारख्या भावना, वासना नसतात वाटतं ?

**हणमंत :** असल्या तरी त्या आंतल्या आंत दाबून टाकून आयुष्य काढायची संवय असते त्यांना ! काहीं कांहीं कॉंग्रेसवाले लग्नं करतात आणि मग बापूजींच्या नांवानं कडक ब्रह्मचर्यपालनाची शपथ घेतात—माहीत नसेल तुला !

**कल्याणी :** अस्सं—अस्सं—काय हो भाऊकाका, अशा माणसांना नंतर वेड लागतं का हो ?

**हणमंत :** चल—तुला कळायचं नाहीं तें. जा बघू तूं हातपाय धुवायला.

[ असें म्हणून माडीवर जातात. कल्याणी मोठ्यानें हसते. बॅगमधलें सामान काढतां काढतां गाते. ]

**कल्याणी :—**

मन माझें कां फुललें ।
स्वप्न काय हें, भासचि का हा ।
कैसें मज ना कळे ॥ धृ० ॥
नाचत आलें त्रिभुवन आनंदें ।
नाचति देवहि सारे ।
हृदया कसें सांवरूं रे ॥ १ ॥

[ नंतर आंतल्या खोलींत जाऊं लागते. तोंच "मालक, मालक" अशा हांका मारीत हणमंतरावांच्या छापखान्याचा मॅनेजर शिरसाट येतो. तो घामाघुम झाला आहे—आणि त्याच्या तोंडून धड शब्दही निघत नाहीं. ]

**कल्याणी :** कोण तुम्हीं ?

**शिरसाट :** मी शिरसाट—

**कल्याणी :** शिरसाट ! तारेचा पत्ता आहे वाटतं हा !

**शिरसाट :** माझं आडनांव आहे तें. पण मालक कुठं आहेत ? अहो मालक—मालक—

**कल्याणी :** असे आग लागल्यासारखे ओरडतां काय !

**शिरसाट :** आगच लागली आहे—मालकांच्याच मुलानं आग लावली आहे छापखान्याला !

**कल्याणी :** आणि ती विझवायची सोडून इथं आलांत ? अगदींच शिरसाट आहांत !

**शिरसाट :** अहो, आग म्हणजे खरीखुरी आग लागली नाहीं—सगळ्या कामगारांना मालकांच्या मुलानं बाहेर काढलं—आणि छापखान्याला टाळं ठोकून हा शिरसाट इथं आला.

**कल्याणी** : होय का ? मग बसा जरा आणि त्या तांब्यांतलं पाणी प्या. तोंपर्यंत मी तोंड धुवून येतें.

[ आंत निघून जाते. शिरसाट पाणी पिऊं लागते. अंबू येते. ]

**शिरसाट** : कोण हो ती बाई ? कधीं पाहिली नाहीं इथं या शिरसाटानं.

**अंबू** : मुंबईहून आली आहे— यांची मैत्रीण आहे म्हणे कॉलेजांतली.

**शिरसाट** : पण मालक कधीं कॉलेजांत गेले होते ?

**अंबू** : त्यांची नाहीं—त्यांच्या मुलाची.

**शिरसाट** : जयंतरावांची होय ?— छान. त्यानं तिथं छापखान्याला आग लावली आणि त्याची मैत्रीण घरीं पाहुणचार झोडते आहे ! मालक कुठं आहेत ?

**अंबू** : वर माडीवर आहेत. अग्रलेख लिहायची वेळ झाली आहे त्यांची. आतां भेटायचे नाहींत तासभर कुणाला. अगोदरच त्यांना उशीर झाला ह्या पाहुण्यापायीं.

**शिरसाट** : अहो, पण अग्रलेख लिहायची तसदी कशाला घेताहेत मालक ? छापखान्याला घालून आलों आहें टाळं भलं मोठं !

**अंबू** : म्हणजे ?

**शिरसाट** : मालकांचे कम्युनिस्ट चिरंजीव आहेत ना—त्यांनीं संपावर नेलं सगळ्या कामगारांना.

**अंबू** : काय—पाहिजे काय त्यांना ?

**शिरसाट** : त्यांना तरी कुठं माहीत आहे तें ? कामगारांचे पुढारी त्यांना संपावर जायला सांगतात आणि ते मेंढरासारखे बाहेर पडतात ? राहतील बाहेर थोडे दिवस आणि उपास घडूं लागले कीं येतील परत कामावर. पण तोंपर्यंत छापखाना बंद राहायचा. आतां इथंच येथील त्यांतले दोघेतिघे मालकांबरोबर वाटाघाटी करायला !

अंबू : [ आशेनें ] हे येणार आतां ?

शिरसाट : म्हणजे जयंतराव ना ?— हो तर. आधीं संप करायचा, मग मालकाशीं वाटाघाटी करायच्या, मग त्या फिसकटायच्या, संप चालू राहायचा आणि अखेर उपासमार व्हायला लागली, कीं कामगारांनींच संप फोडायचा—हें सगळं कांहीं ठरून गेल्यासारखं आहे गिरण्यांपासून छापखान्यांपर्यंत ! ते यायच्यापूर्वी मालकांची भेट घ्यायला हवी होती मला.

अंबू : त्यांना सांगून येतें तुम्हीं आलां आहांत म्हणून.

[ अंबू माडीवर जाते. कल्याणी तोंड धुवून येते. आरशासमोर केसांवरून फणी वगैरे फिरविते. ]

कल्याणी : हं. एकूण संप घडला आहे तर तुमच्या छापखान्यांत !

शिरसाट : हो—आणि तो मालकाच्या मुलानंच घडवून आणला आहे, हें विशेष.

कल्याणी : कॉलेजांत आम्हीं एकदां वरेरकरमामांचं "सोन्याचा कळस" नाटक केलं होतं—त्यावेळीं जयंतानं मालकाच्या मुलाचंच काम केलं होतं !

शिरसाट : नाटकांत ठीक आहे—पण इथं प्रत्यक्षच—

कल्याणी : मग आतां बापलेकांत चांगलाच तंटा होणार तर !

शिरसाट : तो नेहमींच चालतो. मालक पक्के कट्टे कॉंग्रेसवाले आणि चिरंजीव पक्के कम्युनिस्ट !

कल्याणी : तुम्हीं ?

शिरसाट : आम्हीं आपले मॅनेजर आहों ! सध्यां शिरसाट मालकांच्या पक्षाचा आहे. मालकानंतर जयंतराव मालक झाले, कीं आम्हीं कम्युनिस्ट होऊं ! टोपी घरीं ठेवून आलं कीं झालं !

कल्याणी : पण मालक झाल्यानंतर जयंता कम्युनिस्ट राहणार थोडाच ! मी तर म्हणतें, हे संप होऊं न देण्याचा उपाय म्हणजे ह्या संप-पुढाऱ्यांनाच मालकीहक्कांत भागीदार करावं !

**शिरसाट** : अहो, भागीदार कशाला ? मालकांच्या मागून जयतरावांच्याच ताब्यांत येणार आहे ना सारं !

**हणमंत** : [ माडीवरून येत ] कोण माझ्या मरणाची वाट पाहातोय् ?—— तुम्हीं का शिरसाट ? वा: रे मॅनेजर !

**शिरसाट** : [ गांगरून ] छेः छेः--मी म्हणत होतों--

**हणमंत** : काय म्हणत होतां ?

**कल्याणी** : तुमच्यानंतर ते टोपी घरीं ठेवून छापखान्यांत येणार आहेत.

**हणमंत** : कां—आमचं सुतक पाळणार आहां ?

**कल्याणी** : छेः--कम्युनिस्ट होणार आहेत ते !

**हणमंत** : मग आतांच कां नाहीं होत ?--चला, ठेवा ती टोपी इथं आणि जा घरीं.

**शिरसाट** : तसं नाहीं मालक. धाकटे मालक इथं येणार आहेत वाटाघाटी करायला—संपावर गेले आहेत कामगार—

**हणमंत** : मग तुम्हीं इथं कशाला आलां ?

**शिरसाट** : मालकांना कळवायला आलों—छापखान्याला टाळं ठोकलं—

**हणमंत** : आणि उद्यांचा अंक ?—उद्यांचा अंक कोण काढणार ? त्याचा बाप ? पौंडाची किंमत दोन डॉलर ऐशीं सेंटावर आली आणि पाकिस्तान रुपयाची किंमत कमी करायला तयार नाहीं——अशा वेळीं अंक बंद ? जा, उघडा छापखाना.

**शिरसाट** : पण कामगार बाहेर पडले आहेत—

**हणमंत** : ते आंत येतील दरवाजा उघडला कीं ! जा. संप करतात म्हणे ! आम्हीं ब्रिटिश राजवटींत हे सारे प्रकार केले आहेत म्हणावं ! आतां हे संप म्हणतात—त्यावेळीं आम्हीं " सत्याग्रह " म्हणत होतों. पोटांत गोळा यायचा पोलिस लाठ्या घेऊन आले म्हणजे ! संप करतात म्हणे !

**कल्याणी** : म्हणजे तुम्हींही आतां पोलिस स्टेशनवर कळवणार कीं काय ?

**हणमंत** : मग आणखी काय करायचं ? राज्य बदललं तरी उपाय ठरलेलेच. त्यावेळीं ब्रिटिश सरकारचे पोलिस होते—आतां आमच्या सरकारचे आहेत ! —पोलिस ते पोलिसच. त्यावेळच्या त्यांच्या लाठ्या लांकडी होत्या आणि आतां थोडेच मेणबत्त्या घेऊन येणार ते हातांत !

**अंबू** : [ घाबरून ] पण भाऊकाका—यांना पाठवून द्या घरीं.

**कल्याणी** : कशाला ? खाऊं दे कीं दोनचार फटके ! अहो आयताच घरीं येऊन बिछान्यावर पडेल ! मग काय, त्याची अशी सेवासुश्रुषा करा, कीं त्याच्या मनांतला "कम्युनिझम" वितळून तिथं तुमची भांडवलशाही सुरू होईल ! अशी संधि पुन्हां येणार नाहीं. भाऊकाका, चला तुम्ही.

**अंबू** : नको—भाऊकाका—माझ्यासाठीं तरी पोलिसांना बोलावूं नका—भाऊकाका—[ पण भाऊकाका शिरसाटासह तावातावानें निघून जातात. ] तुम्ही—तुम्हीं—

[ पुढें तिच्या तोंडून शब्द फुटत नाहीं व ती खुर्चीवर बसून मुसमुसूं लागते. ]

**कल्याणी** : [ तांब्यातील पाणी ओतून प्याला तिच्याजवळ नेत ] असं काय शांता आपटेसारखं अॅक्टिंग करतां ?—पाणी प्या. [ ती हातानें पेला उडवून देते. ] नको ? राहिलं. एखादा गझल येत असला तर म्हणा ! छान वेळ आहे ही !

**अंबू** : तुम्हांला काय ही सगळी चेष्टा वाटते ?

**कल्याणी** : मग काय पुण्यावर अॅटम बॉंब पडल्यासारखा गंभीर प्रसंग आहे हा ? उगीच तुम्हीं एवढा बाऊ करतां !

**अंबू** : हो—उगीच करतें ! आतां भाऊकाकांनीं पोलिस आणले आणि तिथं गडबड झाली—

**कल्याणी** : [ मध्येंच ] तर कामगारांनाच काय तो त्रास होईल. जयंता तिथून केव्हांच निसटून येईल घरीं !

**अंबू :** ते राहाणार नाहींत तिथं ?

**कल्याणी :** अशा वेळीं पुढाऱ्यांनी राहायचं नसतं तिथं ! मग पुन्हां संप कोण घडवून आणील ? शिर सलामत तर पगडी पचास ! मार खायचा असतो कामगारांनीं ! तुम्हीं कांहीं काळजी करूं नका.

**अंबू :** तुम्हीं म्हटलंत तरी मन राहात नाहीं.

**कल्याणी :** नाहीं तुम्हांला पटत तर जातें बापडी मी ! पहा तुम्हीं त्याची वाट.

[ सावकाशपणें माडीवर जाते. अंबू विचार करीत तशीच बसून राहाते. नंतर खिडकींतून, दरवाजांतून बाहेर पाहाते. कसली तरी अवघड तान घेत आणि खिशांतले चणे खात दामुअण्णा येतात. ]

**दामुअण्णा :** काय ग अंबे, आला का जयंता ?

**अंबू :** नाहीं. आतां कुठल्या स्थितींत येतात कोण जाणे !

**दामुअण्णा :** का दारूबिरू प्यायला लागलाय् कीं काय तो ?

**अंबू :** छे: हो. पण भाऊकाका पोलिसांना घेऊन जाणार आहेत छाप-खान्यांत. संप केला आहे म्हणे सगळ्या कामगारांनीं.

**दामुअण्णा :** आणि हा त्यांचा पुढारी वाटतं ?——वाः छान छान !

**अंबू :** आतां पोलिसांनीं लाठीमार केला म्हणजे——

**दामुअण्णा :** कामगारांचीं डोकीं फुटतील ! तुला भ्यायचं कांहीं कारण नाहीं. जयंता अगोदरच निघाला असेल तिथून.

**अंबू :** तुम्हालाही तसंच वाटतं ?

**दामुअण्णा :** म्हणजे आणखी कुणाला वाटलं ?

**अंबू :** ती त्यांची मैत्रीण आली आहे ना मुंबईहून—ती पण असंच म्हणाली.

**दामुअण्णा :** कुठं आहे ती ?

**अंबू :** नुकतीच माडीवर गली.

दामुअण्णा : म्हणजे त्याला मैत्रिणबित्रीण आहे वाटतं ! अंबे, संभाळ हं.

अंबू : अण्णा, मला पांचवारी साडी आणून द्या. आणि यापुढं मी असा अंबाडा घालणार नाहीं.

दामुअण्णा : ठीक आहे. पण तेवढ्यानं भागेल ना ! कीं मीदेखील बूट-पाटलोण घालायला लागूं ? वेडी आहेस अंबे. अग कपड्यानं काय होणार आहे ? तपश्चर्या कर—तपश्चर्या. आम्हीं भातखंड्यांचीं पुस्तकं घेऊन बसलों नव्हतों; चांगले दिवसरात्र गुरासारखी सेवा करीत होतों खांसाहेबांची त्यांच्या घरीं. कधीं म्हणायचे, बेट्या, पाय चेप; तर कधीं पाठींत बुक्के मारायला सांगायचे, कधीं परोटे बडवायला सांगायचे, तर कधीं अंग रगडायला सांगायचे. भर उन्हांत अफु आणायला पाठवायचे, तर कधीं आपले कपडे नदीवर धुवून आणायला सांगायचे ! रामरामराम ! काय ते कपडे ! सबंध नदी काळीकुट्ट व्हायची ! पिकदाण्या तर रोजच धूत होतों. मग एखाद्या रात्रीं झोपेंतून उठवून म्हणायचे, दाम्या, घे तंबोरा. आणि मग एखादा राग सुरू करायचे तो सकाळीं दहा वाजेपर्यंत ! असे हाल काढले आहेत बरं अंबे, तुझ्या बापानं—आणि तूं पातळं बदलायच्या आणि अंबाडा सोडायच्या गोष्टी करते आहेस !

अंबू : मला खांसाहेबांशीं लग्न करायचं नाहीं आहे, अण्णा, ती त्यांची कॉलेजमधली मैत्रीण आली आहे, तिला एकदां पाहा म्हणजे कळेल तुम्हाला.

दामुअण्णा : अंबे, अंबे, ह्या कॉलेजांतल्या पोरी लग्नाला उपयोगी नसतात. चार दिवस बागडायला ठीक असतात. बागडूं दे यालाही चार दिवस तिच्याबरोबर हवं तर ! अखेर बायको म्हणून तुलाच पसंत करील तो

अंबू : कोण जाणे काय होतं तें आतां. तिला सोडून माझ्याकडे बघायला जाड भिंगांचा चष्माच लावायला हवा त्यांना !

दामुअण्णा : म्हणजे इतकी का देखणी आहे ती !

**अंबू :** अहो, बोलून चालून नायकिणीची मुलगी—सुंदर नसणार तर काय !

**दामुअण्णा :** आ—नायकिणीची ? कुठून आली आहे ? गोव्याहून ?

**अंबू :** मुंबईहून.

**दामुअण्णा :** गाते–बिते का ?

**अंबू :** मी कशाला चौकशी करूं गाते का नाचते ती ?

**दामुअण्णा :** तूं नाहीं केलीस तरी मला केली पाहिजे. खूप फिरलों आहों मी आणि तुझा सासरा पूर्वी या लोकांत.

**अंबू :** भाऊकाका ?

**दामुअण्णा :** तर ? मोठा शोकिन् होता गाण्याबजावण्याचा पूर्वी. आतां ती पांढरी टोपी चढवून बसलाय डोक्यावर ! खुळा कुठला ?

[ असें म्हणत माडीवर जातात. अंबू भाऊकाकांबद्दल दामुअण्णांनीं काढलेल्या उद्गारांचें आश्चर्य करीत तशीच उभी राहते. इतक्यांत जयंता येतो व माडिवर जाऊं लागतो. ]

**अंबू :** आलांत ? कुठं लागलं बिगलं नाहीं ना तुम्हांला ? मी किती सांगितलं भाऊकाकांना.—थांबा वर नका जाऊं.

**जयंता :** कां पोलीस ठेवले आहेत मला पकडायला ?

**अंबू :** नाहीं—नाहीं—पण वर नका जाऊं. थोडा वेळ थांबा.

**जयंता :** [ सामानाकडे लक्ष जाऊन ] आणि हें सामान कुणाचं ? कोण आलं आहे ?

**अंबू :** कुणी नाहीं.

**जयंता :** कुणी नाहीं ? मग काय आकाशांतून पडलं हें ? [ सामानाजवळ जाऊन बॅग पाहात ] अं ? कल्याणी आली आहे ? कुठं आहे ?

[ तो वर जाणार इतक्यांत हणमंतराव व शिरसाट बाहेरून येतात. ]

**हणमंत :** संप करतात म्हणे ! आतां येतील नीट वठणीवर ! [ जयंताकडे लक्ष जाऊन ] तूं कां आलास इथं ? बाहेर नीघ. नीघ या घराच्या बाहेर.

**अंबू :** भाऊकाका—

**हणमंत :** साप बाळगायचा नाहीं मला घरांत. हो बाहेर—

**जयंता :** बाहेर पडायला केव्हांही तयारी आहे माझी ! पण—

**हणमंत :** आतां पण नाहीं न् परंतु नाहीं. पोटांत कावळे ओरडायला लागले म्हणजे तुझा कम्युनिझम् किती दिवस टिकतो तें पाहूं दे मला. असा आहेस तसा बाहेर नीघ घराच्या. [ माडीवरून कल्याणी खालीं येऊं लागते. ]

**जयंता :** कल्याणी—तूं इथं !

**कल्याणी :** [ सामान आवरीत ] हं—आलें होतें तुझ्याकडे म्हणून—पण आता काय, तूच चाललास घराबाहेर—आम्हांला कोण ठेवणार घरांत ! तूं हरामखोर—मी तुझी मैत्रीण—फ्रेंड !

**हणमंत :** जा—व्हा चालते घरांतून दोघंही.

**अंबू :** नको, भाऊकाका—

**कल्याणी :** कां हो ? मी कांहीं तुमची पाहुणी नाहीं—याची. आणि हा चालल्यावर मी इथं कोण म्हणून राहूं ?—चल रे जयंता, उचल हें बेडिंग. बस्स झाला पाहुणचार. जातें मी एखाद्या चांगल्याशा हॉटेलांत राहायला. मला अजून माझ्या वडलांना भेटायचं आहे. आतां तूं ये तर खरा मुंबईला आमच्या घरीं—हॉटेलचाच रस्ता दाखवतें तुला !—बरं आहे अंबाबाई. तुमच्या इच्छेप्रमाणं मी जातें इथून. बरं आहे शिरसाट—
[ दोघंही जातात. ]

**दामुअण्णा :** [ माडीवरून येत ] अरे हणमंता, ही त्या मेनकेची पोरगी. तिनं आपल्या आईचं नांव सांगितलं आणि चटकन् ओळखली मी तिला !

**हणमंत :** मेनका !

**रामुअण्णा :** अरे, ती चवळीची शेंग म्हणत होतास तूं—आठवतं का ? [ मोठमोठ्यानं हंसून त्यांच्या पाठीवर थाप मारतात. ]

**हणमंत :** [ बऱ्याच वर्षांपूर्वीच्या काळांत शिरून ] चवळीची शेंग ? मेनका ?—म्हणजे—

[ पुढें त्यांच्या तोंडून शब्द फुटत नाहीं व ते कल्याणी गेलेल्या दरवाज्याकडे पहात रहातात. ]

[ पडदा पडतो. ]


दामोदर हॉलनजिक

अंक पडल्यावर

जोगळेकर हॉटेल

पोयबावडी, मुंबई, नं. १२.

# अंक २ रा

[ एका इंग्लिश हॉटेलमधील एक प्रशस्त खोली. समोर दरवाजा असून त्यावर शोभिवंत पडदा सोडला आहे. समोर दोन्ही बाजूस दोन खिडक्या असून त्यांनाही पडदे लावले आहेत. डाव्या बाजूला एक दरवाजा असून त्यांतून न्हाणीघराकडे जाण्याची वाट आहे. उजव्या बाजूस पलंग आहे. मध्यभागीं एक वर्तुळाकार टेबल व दोन-तीन खुर्च्या असून भिंतीला टेकून एक ड्रेसिंग टेबल, आरामखुर्ची वगैरे फर्निचर आहे. भिंतीला एक कॅलेंडर व रेल्वेचें टाईमटेबल अडकवलें आहे. एक ताजमहालचा व दुसरा काश्मीरचा देखावा असलेल्या दोन फ्रेम्स लावल्या आहेत.

कल्याणी न्हाणीघरांतून टॉवेलनें तोंड पुशीत येते. ती नुकतीच आंघोळ करून आलेली दिसत आहे ड्रेसिंग टेबलसमोर उभी राहून ती कुंकू लावते व फणीने केंस विंचरूं लागते. ]

**कल्याणी** : बॉय.

[ असें म्हणून ती बाजूची स्प्रिंगची घंटा दाबते. हॉटेलचा एक नोकर येतो. ]

**नोकर** : काय, बाईसाहेब ?

**कल्याणी** : साहेब झोपले आहेत कारे अजून ?

**नोकर** : होय, बाईसाहेब.

**कल्याणी** : बरं, मग मलाच चहा घेऊन ये.

**नोकर** : होय, बाईसाहेब.

[ नोकर जातो. कल्याणी आपली वेशभूषा करीत गुणगुणते. हळूहळू स्वत:शींच ती मोठ्यानें गाऊं लागते. गातां गातां टेबलावरील ताजीं वर्तमानपत्रें चाळते. ]

**कल्याणी :—**

गोपाल—गोपिकांनों । द्या हो निरोप आतां ॥
आतां वियोगकालीं । घ्या हो प्रणाम माझा ॥ धृ० ॥
ही हांक ऐकताना । हृदयास ओढ लागे ॥
परि मी कैसें सांगूं । ‘मज द्या निरोप आतां’ ॥ १ ॥

[ गाणें संपण्याच्या सुमारास नोकर एका ट्रेमधून चहा, बिस्किटें वगैरे घेऊन येतो व ट्रे टेबलावर टेवून बाजूस उभा राहातो. ]

**कल्याणी** : [ त्याच्याकडे पाहून ] काय रे ?

**नोकर** : बाहेर कुणी भेटायला आला आहे.

**कल्याणी** : कोण आहे ?

**नोकर** : म्हातारासा माणूस आहे.

**कल्याणी** : बोलाव त्याला.

[ नोकर जातो. कल्याणी चहा तयार करूं लागते. दामुअण्णा येतात. ते गांगरल्यासारखे इकडे तिकडे पाहात आंत येतात. ]

**कल्याणी** : या, खांसाहेब. एकटेच आलांत ?

**दामुअण्णा** : [ बाहेर पहात ] हं.

**कल्याणी** : कुणाला शोधतां आहां ?

**दामुअण्णा** : म्हणजे—तुम्ही एकट्याच राहातां तर !

**कल्याणी** : हो. आणि बाजूच्या खोलींत तुमचे जांवईबुवा एकटेच राहा-तात. कुणाला भेटायला आलां आहांत ?

**दामुअण्णा** : तुम्हांलाच.

**कल्याणी** : हो का ? बसा. चहा घेतां ?

**दामुअण्णा** : नको. [ कल्याणी चहा पिऊं लागते. दामुअण्णा मधून मधून तिच्याकडे व दरवाज्याकडे पाहातात. ]

**कल्याणी** : ( कप ठेऊन ) हं, बोला आतां.

**दामुअण्णा** : तुमची आई आमच्या ओळखीची आहे.

**कल्याणी** : असं का ? आमच्या म्हणजे—

**दामुअण्णा** : म्हणजे हणमंताच्या देखील—जयंताचा बाप !

**कल्याणी** : हो का ? आश्चर्य आहे. ते कॉंग्रेसमन आहेत ना ?

**दामुअण्णा** : हो—तरी देखील नो ओळखतो तिला. पूर्वी आम्हीं जात असूं तिच्या घरीं गाणं ऐकायला. केव्हां केव्हां चांगली गायची ती. वझेबुवांकडे शिकली होती ती. वझेबुवांचं फार जाणं-येणं तुमच्या बायकांत.

**कल्याणी** : हो, आई सांगायची केव्हां केव्हां. काय जिलब्या खायचे म्हणे ! साखरेचे पदार्थ खाऊं नका म्हणून डॉक्टर सांगत, पण अखेरपर्यंत त्यांनीं जिलब्या आणि लाडू पचवले.—तुम्हीं चणे खातां वाटंत ?

**दामुअणा** : हो, आम्हांला ती खोड आहे. कांहीं केल्या सुटत नाहीं. [ खिशांतून पुडी काढीत ] भर्जी हवींत का ?

**कल्याणी** : नको.

**दामुअण्णा** : तुम्ही कां नाहीं शिकलां गाणं ? तुमच्या जातीनं आमची संगीतकला जिवंत ठेवली आहे, तर म्हणायचं तर !

**कल्याणी** : कां--हल्लीं मोठमोठ्या घराण्यांतल्या बायकादेखील नाचणं-गाणं शिकतात कीं ! दुर्गाबाई खोटे तर म्हणे एका खांसाहेबाल्लाच बरोबर बाळगीत होत्या कांहीं वर्षे.

**दामुअण्णा**: उं:, तें आपलं हौस म्हणून ! फॅशन झाली अलीकडे ती मुंबईत ! पण गाणं-नाच ह्या कला तुमच्या जातीनंच टिकवल्या आहेत. तुमच्या गळ्यांत--

**कल्याणी :** [ मध्येंच ] मंगळसूत्र म्हणतां ?

**दामुअण्णा :** नाहीं नाहीं--तुमच्या आईची गायकी असणारच थोडीफार.

**कल्याणी :** तुमच्या मुलीच्या गळयांत आहे का ?

**दामुअण्णा :** छे: हो ! त्या पोरीला किती वेळां बस म्हटलं तंबोरा घेऊन, पण ती आपली लग्नाचा छंद घेऊन बसली आहे.

**कल्याणी :** लग्नालाच योग्य आहे ती. स्वयंपाक चांगला करते म्हणे ! तुम्हीं लग्न कां नाहीं करून टाकीत तिचं ?

**दामुअण्णा :** त्यासाठींच तर हणमंताच्या घरीं आणून ठेवली आहे आज सहा महिने !

**कल्याणी :** का हो खांसाहेब...

**दामुअण्णा :** ( मध्येंच ) दामुअण्णा माझं नांव.

**कल्याणी :** बरं--का हो दामुअण्णा, हें कसं काय दिसतं तुम्हाला--एक गृहस्थाची तरुण अविवाहित मुलगी दुसऱ्या घरांत एका तरुण पुरुषाला वश करण्यासाठीं आणून ठेवायची--त्या घरांत दुसरं बाईमाणूस नाहीं--

**दामुअण्णा :** पण लग्न होणार आहे तिचं जयंताशीं.

**कल्याणी :** त्या आशेनं ठेवायची म्हटलं, तरी सामाजिक नीतिमत्तेच्या दृष्टीनं ही गोष्ट तुम्हाला कितपत योग्य वाटते ? समजा, मी त्या घरांत लग्नाशिवाय तुमच्या मुलीसारखीच महिना-दोन महिने राहिलें असतें तर--

**दामुअण्णा :** छे: छे:--तुम्ही आणि अंबू यांत फरक आहे.

**कल्याणी :** कोणता ?

**दामुअण्णा :** अहो, ती गृहस्थाची मुलगी आहे. आणि तुम्ही--माफ करा हं--पण--

**कल्याणी :** माफ करतें तुम्हाला--पण मी नायकिणीची मुलगी म्हणून माझं तिथं राहाणं वाईट दिसलं असतं, नाहीं ! पण ती गृहस्थाची मुलगी असून जयंताला वश करण्यासाठीं त्या घरांत खुशाल सहा महिने लोळत

पडली आहे. आम्हीं नायकिणी तरी दुसरं काय करतों ! पुरुषांना वश करण्याचा आमचा कित्ताच ती गिरवते आहे—गृहस्थाची मुलगी असून ती आमचाच व्यवसाय करते आहे—

**दामुअण्णा :** [ गांगरून ] म्हणजे तुमचं म्हणणं—

**कल्याणी :** [ मध्येंच ] हेंच, कीं तुम्हीं, अंबू, तुमचे भाऊकाका हां हां म्हणतां आमच्या पोटावर पाय आणतां आहां !

**दामुअण्णा :** [ जास्तच गांगरून ] अहो, काय—म्हणतां काय ! छेः छेः छेः—तिचं जयंताशीं लग्न करायचं आहे आम्हांला—

**कल्याणी :** म्हणून लग्नाच्या अगोदरच सहा महिने आणून टाकलीत तिला ! समजा, त्यानं तिच्याशीं लग्न केलं नाहीं, तर काय दुसऱ्या घरीं नेऊन ठेवणार आहांत तिला ?

**दामुअण्णा :** छेः छेः—

**कल्याणी :** केव्हां केव्हां विचार करायला लागलं, कीं वाटतं, सभ्य सभ्य म्हणणाऱ्या घराण्यांत किती घाण सांचलेली असते ! आम्ही बोलून चालून नायकिणी— आमचा तो व्यवसायच ठरलेला. पण आम्हीं जें पैसे घेऊन करतों, तें तुम्ही सभ्य घरांतलीं माणसं फुकट करतां ! ज्याचं कधीं तोंड पाहिलेलं नाहीं, अशा एखाद्या पुरुषाच्या गळयांत माळ घालायची आणि तिला त्याच्या खोलींत ढकलून दार लावून घ्यायचं—हाही प्रकार त्यांतलाच ! आमच्या जातींतल्या बायका तरी निराळं काय करतात ?

**दामुअण्णा :** अहो, आमच्या मुली संसार करतात—तुम्हांला संसार म्हणजे काय ठाऊक आहे ?

**कल्याणी :** ज्याला तुम्ही संसार म्हणतां त्यालाच आम्ही धंदा म्हणतों ! फक्त नांवं वेगळीं. पण आमच्या बायकांना जें सुख आहे, तें तुमच्या बायकांना नाहीं. अहो दामुअण्णा, आम्हीं नको असलेल्या पुरुषाला घालवून देऊं शकतों—तुमच्या बायकांत आहे का ती धमक ?

**दामुअण्णा** : छेः छेः, तुम्हीं हें कांहींतरीच बोलतां. तुमच्या जातीबद्दल मला आपुलकी आहे—गाणाऱ्या बायका तुमच्या जातींतच सांपडायच्या. पण तेवढं सोडलं, तर तुमची-आमची बरोबरी कधींच व्हायची नाहीं.

**कल्याणी** : [ हंसून ] खरंच व्हायची नाहीं. आम्हीं सगळ्या गोष्टी उघडउघड करतों—तुम्हांला त्या निरनिराळ्या नांवांखालीं कराव्या लागतात ! आतां हेंच पाहा ना, आम्हां नायकिणींच्या घरीं पाऊल टाकणं हें असभ्यपणाचं म्हणतात; पण तुम्हीं, भाऊकाका गाणं ऐकण्याच्या निमित्तानं येतच होतां कीं आमच्या घरीं पूर्वी ?

**दामुअण्णा** : हो—[ आठवण होऊन ] हल्लीं जयंताही येऊन राहातो म्हणे तुमच्या घरीं—अंबूच सांगत होती.

**कल्याणी** : त्याचे भाऊकाकाही येत होते माझ्या आईकडे पूर्वी—तुम्हींच म्हणाला !

**दामुअण्णा** . हो, पण आम्हीं तिचं गाणं ऐकायला येत होतों.

**कल्याणी** : जयंता माझं भाषण ऐकायला येतो.

**दामुअण्णा** : हो हो—मोठ्या मिष्ठास बोलतां तुम्हीं ! पण तुम्हीं गाणं कां नाहीं शिकलां ? अहो, चांगलं रूप आहे, हुषार आहांत, तरुण आहांत—सोन्यानं पैसा ओढाल !

**कल्याणी** : [ थट्टेनें ] तुम्हीं शिकवतां का ?

**दामुअण्णा** : वाः वाः, मोठ्या आनंदानं, हल्लीं शिकणारेच मिळत नाहींत; म्हणून तर कांहीं कांहीं घराण्यांचं गाणं अजिबात नाहींसं झालं. केव्हां करतां सुरुवात ? बसा—शुभस्य शीघ्रम—म्हणा सा—

**कल्याणी** : सा—

**दामुअण्णा** : अहा ! काय "सा" लागला ! तुमच्या आईची आठवण झाली. रे—

**कल्याणी** : रे—आतां कुणाची आठवण झाली ? [ अंबू दरवाज्यांत

येऊन उभी राहाते. तिच्याकडे लक्ष जाऊन ] या,—इतका वेळ बाहेरच उभ्या होतां?

**दामुअण्णा :** अरेच्या! विसरलोंच बरं का मी अंबे!

**कल्याणी :** [ तिच्या वेषभूषेंतील फरक पाहून ] वाः, बराच फरक पडला, कीं तुमच्यांत एका रात्रींत!

**अंबू :** काय करणार! गिऱ्हाइकाला आवडेल तसा माल तयार करावा लागतो ना!

**कल्याणी :** पाहिलंत दामुअण्णा, आम्हीं तरी दुसरं काय करतों? आणि तुम्हीं म्हणतां, तुमच्यांत आणि आमच्यांत फरक आहे!—या, बसा. चहा घेतां? [ अंबू तोंड फिरवते. ] माझ्या हातचा नाहीं तो; हॉटेलांतला.

**अंबू :** नको मला.—अण्णा—

**दामुअण्णा :** काय?—हां हां—जयंता आहे शेजारच्या खोलींत.

**कल्याणी :** उठला नाहीं अजून तो.

**दामुअण्णा :** म्हणजे रात्रीं जागरण झालं होतं वाटतं?

**कल्याणी :** हं.—मीटिंग होती त्याच्या पार्टीची म्हणे! रात्रीं केव्हां आला कुणाला ठाऊक. पाहून येतें हं उठला का. [ जाते. ]

**दामुअण्णा :** अंबे, बोल, काय करणार आहेस तूं आतां? तुझ्यासाठीं सतरा हॉटेलं धुंडाळून अखेर या दोघांचा पत्ता काढला. आतां काय करायचा बेत आहे तुझा?

**अंबू :** तुम्हीं जा घरीं.

**दामुअण्णा :** आणि तूं?

[ नोकर येऊन चहाचा ट्रे नेऊं लागतो. ]

**अंबू :** मी इथंच राहाणार आहे.

**दामुअण्णा :** अग, पण हॉटेल आहे हें. इथं रोज पैसे द्यावे लागतात. [ नोकरास ] काय रे, इथं रोजचं भाडं काय आहे?

**नोकर** : दहा रुपये, साहेब.

**दामुअण्णा** : ऐकलंस—दहा रुपये. कुठून देणार तूं ?

**अंबू** : तुम्हीं आहांत कीं !

**दामुअण्णा** : मी ? अग, चार शिकवण्या आहेत, त्यांत काय काय करूं ?

**अंबू** : हुंडाच दिला म्हणून समजा. मी नाहीं येणार घरीं.

**दामुअण्णा** : अग, पण त्यानं तुला राहूं दिलं पाहिजे ना इथं ?

**अंबू** : हॉटेल कांहीं त्यांचं एकट्याचं नाहीं, कुणीही येऊन राहावं. ही इथं असेपर्यंत मीही इथंच राहाणार.

[ कल्याणी व जयंता येतात. ]

**कल्याणी** : ही बघ बाबा, तुझी बायको आली आहे तुला घेऊन जायला.

**अंबू** : घेऊन जायला नाहीं आलें; इथंच राहायला आलें आहे.

**कल्याणी** : म्हणजे—हॉटेलांत ?

**अंबू** : हो.

**जयंता** : [ दामुअण्णांस चेष्टेनें ] म्हणजे तुमची कुठं दरबारांत गवई म्हणून नेमणूक झाली कीं काय ?

**दामुअण्णा** : अरे, संस्थानंच खालसा झालीं तिथं दरबार कुठला आणि गवई कुठला ! कांहींतरी बोलते आहे ही पोरगी !

**अंबू** : कांहींतरी नाहीं अण्णा. मी खरं तेंच सांगतें.

**जयंता** : ठीक आहे. विचार मॅनेजरला एखादी खोली रिकामी आहे का ?

**दामुअण्णा** : अरे, तिला निराळी कशाला ?

**जयंता** : [ कल्याणीस ] मग काय तुझ्या खोलींत राहाणार आहे ?

**कल्याणी** : राहील बिचारी दोन दिवस मी असेपर्यंत.

**अंबू** : मी कशाला तुमच्या खोलींत राहूं यांची खोली असतांना ?

**जयंता** : माझ्या खोलींत ?

**कल्याणी** : अरे बाप रे! आणि हा एकटा असतांना ?— अहो, हे कम्युनिस्ट लोक महाभयंकर असतात! एकट्या-दुकट्या बाईनं यांच्या-कडे राहायची सोय नाहीं. इतके दिवस निदान याचा बाप तरी आसपास होता. तुम्हीं नका याच्या भानगडींत पडूं.

**अंबू** : आणि तुम्हींही नका आमच्या भानगडींत पडूं. तुमच्या बापाचा पत्ता लावायला आलां आहांत तेवढाच उद्योग करा तुम्हीं.

**जयंता** : बापाचा पत्ता ? म्हणजे ?

**अंबू** : म्हणजे यांचा बाप जन्मापासून बेपत्ता आहे म्हणे! तो इथं पुण्यांत असल्याचं यांना नुकतंच कळलं, म्हणून त्यांना भेटायला आल्या आहेत.

**जयंता** : होय, कल्याणी ?

**कल्याणी** : होय बाबा, त्यासाठींच आलें आहें मी. तुझ्या भाऊकाकांना देखील सांगितलं मी. आणि तुझी नि माझी किती मैत्री आहे, तेंही यांना सांगून टाकलंय मी. हो-म्हणजे उद्यां लग्न झाल्यावर यांना कसला संशय यायला नको.

**जयंता** : लग्न ? आणि हिच्याशी !

**कल्याणी** : का—स्वयंपाक चांगला करते ती !

**जयंता** : मग एखादा आचारी ठेवलेला काय वाईट ? नको असला तर काढून तरी टाकतां येईल.

**कल्याणी** : पण. भाऊकाकांचा वंश कसा वाढेल ! त्याला तर आचारी उपयोगी नाहीं ना पडायचा ? ( हंसते. )

**जयंता** : त्याची काळजी मी कशाला करूं ?

**कल्याणी** : मग काय भाऊकाकांनीं करायची ? त्यांनी आपली जबाबदारी पार पाडली, आतां तुझी जबाबदारी तूं पार पाडायला हवी. खरं कीं नाहीं दामुअण्णा ?

**दामुअण्णा** : हो तर.

**जयंता** : केवळ वंश वाढवायलाच लग्नं करायचीं असतात, तर मी म्हणतों, त्यासाठीं लग्नाचीदेखील जरूर नाहीं ! लग्न न करतांही तें कार्य करतां येईल !

**कल्याणी** : तें कार्य आम्हीं करतोंच आहों ! तुम्हीं म्हणजे कुटुंबवत्सल, सभ्य गृहस्थ—तुम्हीं भटाब्राह्मणांना बोलवून, वाजंत्रीं आणून जाहीर रीतीनं हें कार्य केलं पाहिजे. तुमच्या घरांत मुलांना आई आणि बाप दोघंही हवींत; आमचं फक्त आईवर भागतं !

**दामुअण्णा** : पण तुम्हांला बापाचा पत्ता लागला आहे ना ?—घेऊन ज' त्याला आपल्या घरीं.

**कल्याणी** : तीच तर मोठी अडचण आहे. मी त्याला बाप म्हणेन, पण त्यानं मला मुलगी म्हणायचं नाकारलं, तर मी तें सिद्ध कसं करूं ? आणि माझी आई तरी सिद्ध कसं करणार ? भटजी नाहीं, वाजंत्री नाहीं—गुपचुप सगळा प्रकार झालेला. बापाला बाप म्हणायची सोय नाहीं ! ही तुमची अंबू तुम्हांला अण्णा म्हणून हांक मारते;—मी माझ्या बापाला तशी हांक मारली, तर तो विश्वामित्रासारखा असा हात करायचा ! [ हंसत सुटते. पण तिला कोणीच साथ करीत नाहीं. अंबूकडे जाऊन ] खरंच, मला तुमचा इतका हेवा वाटतो ! तुम्हीं लहानपणीं तुमच्या या अण्णांच्या मिशा ओढल्या असतील, त्यांच्या अंगावर वाटेल ती घाण केली असेल, त्यांचं बोट हातांत धरून रोज फिरायला जात असाल, बाहुल्यांसाठीं आणि बोळक्यांसाठीं त्यांचा पिच्छा पुरवला असेल, रागानें कधीं त्यांना ओरबडलं असेल--काय मजा मजा केली असेल तुम्हीं ! लहानपणीं मला वाटतं मुलांना आईपेक्षां बापच जास्त प्रिय असतो. [ नोकर येतो. ]

**नोकर** : [ जयंतास ] साहेब, आपल्याला भेटायला तीन-चार माणसं आलीं आहेत.

**जयंता** : आलों—चल. [ जयंता व नोकर जातो. ]

**दामुअण्णा** : तुमचं म्हणणं अगदीं खरं आहे. हिला आपल्या आईपेक्षां

माझाच लळा जास्त होता लहानपणीं. आणि पांच–सहा वर्षांनीं ती वारली तेव्हांपासून तर मीच हिची आई आणि मीच हिचा बाप—अंस झालंय. आतां एकदां सुखरूपपणें तिचं लग्न झालं कीं सुटलों. तुम्हीं आल्यापासून पोरगी अगदीं बेचैन झाली आहे.

**कल्याणी** : पाहातेंच आहें मी.

**दामुअण्णा** : भारी जीव जडला आहे तिचा जयंतावर. परवां बाप'नं त्याला घराबाहेर काढल्यापासून तर हणमताशीं एक शब्ददेखील बोलली नाहीं. तेहि जरा शरमला आहे. हिच्यावर माझ्यापेक्षां माया जडली आहे त्याची.

**कल्याणी** : मग घेऊन कां जात नाहींत त्याला परत घरीं ?

**दामुअण्णा** : तेंच सांगणार आहें मी त्याला. त्यावेळीं बोलायची कांहीं सोय नव्हती. आतां जरा तवा थंड झाला आहे. गेल्यावर काढणार आहें गोष्ट त्याच्याजवळ. पण हा येईल कीं नाहीं, हा प्रश्नच आहे. बापापेक्षां भडक आहे. आणि त्यांत कम्युनिस्ट ! नेहमींच बापलेकांचे तंटे चाललेले असतात राजकारणावरून. त्यांत ही भर पडली. कालपासून जरा नरम पडला आहे तो छापखानाच बंद पडला, मग करणार काय ! वाटाघाटी करणार आहे म्हणे जयंताला बोलावून. ( जयंत येतो. )

**जयंता** : आले कीं नाहीं वठणीवर ! आतां मला छापखान्यांत बोलवायला पाठवलंय. पोलिसांना बोलावलं होतं त्यावेळीं कुठं गेली होती अक्कल !

**दामुअण्णा** : जाऊं दे रे. आपल्याच बापाशीं अशी तेढ धरण्यांत काय फायदा ? आहे चार दिवस—नंतर सारं तुझ्याच ताब्यांत येणार आहे. मग जातो आहेस ना ?

**जयंता** : हो—पण मुलगा म्हणून नव्हे; कामगारांचा पुढारी म्हणून.

**दामुअण्णा** : कुठल्याही नात्यानं जा—पण जा एकदांचा. चल अंबे, आपणही जाऊं—भेटूं पुन्हां. आहांत ना चार दिवस ?

**कल्याणी :** अंह; उद्यां जाईन म्हणतें.

**शामुअण्णा :** पण तुमच्या बापाला भेटल्याशिवाय ?

**कल्याणी :** तो भेटेल आज.

**जयंता :** म्हणजे लागला का तुला त्याचा पत्ता ?

**कल्याणी :** हो.

**जयंता :** कुठं आहे तो ? नांव काय त्याचं ?

**कल्याणी :** सांगतें सारं तुला. आतां अगोदर भाऊकाकांनीं बोलावलं आहे तिथं जा. आल्यावर सांगेन सारं. जा. [ जयंता जातो. ]

**शामुअण्णा :** काय हो, खराच लागला कीं काय पत्ता तुम्हांला ?

**कल्याणी :** मग काय मी खोटं सांगतें ?

**शामुअण्णा :** [ जातां जातां ] चल अंबे, जाऊं घरीं.

**अंबू :** मी नाहीं येत. तुम्हीं जा.

**शामुअण्णा :** अग, पण आतां हा वाटाघाटी करायला गेला आहे. होतील बापलेक पुन्हां एक.

**कल्याणी :** हो, आणि जयंताही जाईल घरीं. इथं थोडाच राहाणार आहे तो मी गेल्यावर !

**अंबू :** पण तुम्हीं केव्हां जाणार ?

**कल्याणी :** आज जाईन म्हणतें—आणि जाण्यापूर्वीं तुमच्या मनासारखं करून जाईन, मग तर झालं ?

**अंबू :** म्हणजे काय करणार ?

**कल्याणी :** काय केलं म्हणजे तुमच्या मनासारखं होईल ? त्याला झिडकारीन, तुमच्याशीं लग्न करायचा त्याला आग्रह करीन, त्याला परत घरीं पाठवीन—आणखी काय करूं ?

**शामुअण्णा :** अहो, इतकं केलं म्हणजे आणखी काय पाहिजे ? काय अंबे, —चल, आतां इथं राहून फायदा नाहीं. तो परत आला तर भडकायचा

आपल्याला इथं पाहून. चल. [ जाऊं लागतात. परत वळून ] पण तुमचा बाप भेटला तर जातां जातां आम्हांला कळवायला विसरूं नका. मोठी उत्कंठा लागून राहिली आहे आम्हांला—म्हणजे हणमंताला देखील.—यायचा देखील तो इथं तुम्हाला विचारायला.

[ दोघंहि जातात. कल्याणी दरवाजा लावून घेते व पर्समधून आपल्या बापाचा फोटो काढून डोळ्यांसमोर धरते. क्षणभर ती आपल्या बापाच्या मांडीवर बसून त्याच्याशीं बाललीला करण्यांत दंग होते. त्या स्वप्नसृष्टींत ती आपल्या अंतः-करणांतील भावनांना मुक्तपणानें वाट करून देण्यासाठीं गाते. ]

कल्याणी :—

ये, ये पित्तया। घे अंकीं तुझ्या।
क्षणीं या आलें भेटाया ॥ धृ ॥
शिशुपणीं जरी तुज मुकलें।
होईल ना रे मीलन आतां।
कशी रे तुला ना माया ॥ १ ॥

[ गाणें संपल्यावर दरवाजावर थापा ऐकूं येतात. कल्याणी दरवाजा उघडते. शिरसाट येतात. त्यांचा चेहरा उतरलेला आहे. ]

**कल्याणी** : कोण शिरसाट !—शिरसाटच नांव तुमचं ना ! नांव बदला बुवा तुम्ही.

**शिरसाट** : हो, बदलतों. आतां नांवच काय—तुम्हीं म्हणाल तर हे कपडे देखील बदलतों.

**कल्याणी** : छेः छेः, तुमचे मालक काय म्हणतील ? कॉंग्रेसमधल्या माणसानें निदान खादीचे कपडे तरी घातलेच पाहिजेत.

**शिरसाट** : चालतोंच आहेना ते आज पंधरा वर्षे; पण त्याचं अखेर हें फळ मिळालं.

**कल्याणी** : काय झालं ?

**शिरसाट** : मालकांनीं कामावरून काढून टाकलं.

**कल्याणी** : तुम्हाला ?

**शिरसाट** : हो—या शिरसाटाला. आज पंधरा वर्षे नोकरी झाल्यावर नोकरीवरून काढून टाकलं ! खादी वापरायला महाग पडते, तरी या शिरसाटानं ती पंधरा वर्षे वापरली. मध्यें लढाईंत कागद महाग झाला, तेव्हां तिप्पट दरानं तो विकून मालकांना पैसा मिळवून दिला. कधीं कुणीं पुस्तकं छापायला आणलीं तर तीन हजारांची ऑर्डर असतांना पांच सहा हजार कॉपी काढून मालकांचा फायदा करून दिला या शिरसाटानं ! आज पंधरा वर्षे छापखान्यांत पांढऱ्याचे काळे हात केले—आणि त्याचं फळ काय, तर हा शिरसाट नोकरीला मुकला !

**कल्याणी** : पण मालकांनीं कां काढलं नोकरीवरून शिरसाटाला ?

**शिरसाट** : हा परवांचा संप ! हा शिरसाट म्हणे मुलाच्या पक्षाचा ! संपाला आंतून फूस या शिरसाटानं दिली—हा आरोप ! मालकांना गांधींची शपथ घेऊन सांगितलं, नेहरूंची शपथ घेऊन सांगितलं—फार काय, माउंटबॅटनची देखील शपथ घेऊन सांगितलं, कीं हा शिरसाट प्राण गेला तरी कम्युनिस्टांना मदत करणार नाहीं ! पण छेः, मालक ऐकून घ्यायलाच तयार नाहींत ! हे कॉंग्रेसमधले लोक म्हणजे आपला हट्ट तडीला नेणारे ! तो चुकीचा आहे, असं त्यांना पटलं, तरी आपला शब्द मागं घ्यायचा नाहीं, म्हणून तो हट्ट शेवटला नेतील.

**कल्याणी** : मग आतां पुढं काय ?

**शिरसाट** : त्यासाठींच तुमचा पत्ता काढीत इथं आलों.

**कल्याणी :** कशाला ? मला काय सरोजिनी नायडू समजलांत कीं काय, कीं मी तुमच्या मालकांना चिठ्ठी देऊन परत तुम्हाला कामावर घ्यायला लावीन ? अहो मी कॉंग्रेसवाली नाहीं.

**शिरसाट :** तुम्ही कोणीही असा—पण या शिरसाटाला अन्नाला लावा.

**कल्याणी :** म्हणून या हॉटेलांत आलां होय ?—काय मागवूं तुमच्यासाठीं ?

**शिरसाट :** म्हणजे–तसं नव्हे. मला पुन्हां नोकरीवर घ्यायला लावा. तुम्हीं जर छोट्या मालकांना सांगितलंत—

**कल्याणी :** अहो, पण त्या दोघांत तर वांकडेपणा आला आहे.

**शिरसाट :** हो, पण मालकांनीं वाटाघाटी करायला त्यांना बोलावून घेतलंय. आतां छोटे मालक सांगतील तें मालक ऐकतील.

**कल्याणी :** अस्सं अस्सं. पण धाकटे मालक माझं ऐकतील ?

**शिरसाट :** वाः, हें काय बोलणं झालं ? तुमची एवढी दोस्ती--

**कल्याणी :** दोस्तीचा उपयोग धंद्यांत करूं नये म्हणतात.

**शिरसाट :** पण ही काय क्षुल्लक बाब आहे ! दोन कुटुंबांना अन्नदान केल्याचं पुण्य मिळेल.

**कल्याणी :** दोन कुटुंबं ?

**शिरसाट :** [ ओशाळल्या चेहऱ्यानें ] होय--या शिरसाटाचीं दोन कुटुंबं आहेत.

**कल्याणी :** म्हणजे--मी नाहीं समजलें.

**शिरसाट :** काय सांगूं तुम्हांला ? पहिलं लग्न लहानपणींच झालं-- आणि दुसरं कांग्रेसच्या तीस सालच्या चळवळींत जमलं.

**कल्याणी :** आणि दोन्ही बायका जिवंत आहेत ?

**शिरसाट :** दोन्ही बायकाच काय—पण दोन्ही बायकांबरोबर त्यांचीं अकरा मुलं हा शिरसाट पोसतो आहे !

**कल्याणी :** अकरा मुलं ?

**शिरसाट :** दोन्ही बायकांची मिळून—एकटीचीं नव्हेत !

**कल्याणी :** छापखान्यांत काम नसतं वाटतं तुम्हांला फारसं ?

**शिरसाट :** काम ?—सकाळीं नऊ वाजतां छापखाना उघडतो, तो छापखान्याचीं आणि मालकांचीं सारीं कामं आटोपून रात्रीं आठ वाजतां घरीं जातो हा शिरसाट. कालपासून वेडापिसा झाला आहे जीव. कधीं एक दिवस छापखाना चुकवला नव्हता.

**कल्याणी :** तुमच्या बायकांना बरं वाटलं असेल, तुम्हीं एक दिवस तरी घरीं राहिलांत म्हणून !

**शिरसाट :** अहो, त्यामुळंच तर कावून गेलों आहें ! एक म्हणते सिनेमाला चला, दुसरी म्हणते नाटकाला जाऊं या—तर पोरं सर्कशीला ओढून न्यायला लागलीं ! म्हटलं, त्यापेक्षां छापखाना पुरवला.—पण तिथं तर या शिरसाटाला दरवाजा बंद झालेला !

**कल्याणी :** मग आतां काय करणार आहां !

**शिरसाट :** तुमच्यापाशीं आलों आहें. काय वाटेल तें करून धाकट्या मालकांना सांगा, दोन बायका आणि अकरा मुलांसकट हा शिरसाट तुम्हांला दुवा देईल.

**कल्याणी :** अहं—तुम्हांला परत छापखान्यांत घेऊं नये, असंच वाटायला लागलं आहे मला.

**शिरसाट :** नका, नका—असं नका म्हणूं. हा शिरसाट तुमचे उपकार कधीं कधीं विसरणार नाहीं.

**कल्याणी :** अहो, पण त्या अकरा आणि दोन तेरा शिरसाटांचे शाप मी कशाला घेऊं ? बिचाऱ्यांना कधीं घरचं सुख नाहीं—तुम्ही आपले दिवसाचे पंधरा तास छापखान्यांत. त्यांना कधीं वाटत नसेल, आपण तुमच्याबरोबर फिरायला जावं, सिनेमाला जावं, नाटकाला जावं—

**शिरसाट :** पण मी त्यांना मधून मधून पाठवतों मालकांकडून पास घेऊन.

**कल्याणी :** पण तुम्हीं कधीं त्यांच्याबरोबर जातां का ? घरीं दोन बायका आहेत—पण तुमचा दिवसांतला सारा वेळ जातो छापखान्यांत. तुमचं लग्न

त्यांच्याशीं झालं आहे का छापखान्याशी?—बस झाली पंधरा वर्षे नोकरी झाली ती छापखान्याची—आतां बायकापोरांची करा.

**शिरसाट** : अहो, त्याच्यासाठींच तर ही नोकरी हवी. नोकरी गेली तर त्यांच्या पोटांत काय घालूं? नाटकं–सिनेमा पाहून काय पोटं भरणार आहेत?

**कल्याणी** : पोटाबरोबर माणसाला मनही दिलेलं असतं. मनाच्या आनंदाला कांहींच का किंमत नाहीं तुमच्या छापखानी आयुष्यांत? गुरांना पेंड घालतात, तशी दोन वेळां तुम्हीं बायकापोरांच्या पुढ्यांत पेंड टाकली म्हणजे झालं वाटतं? तुमचा गोठा छापखान्यांत आणि त्यांचा घरांत! जा; मालकांना म्हणावं, आतां तुम्हीं पगार वाढवलात तरी मी नोकरी करणार नाहीं छापखान्यांत!

**शिरसाट** : त्यांनीं तर काढून टाकलंच आहे नोकरीवरून.

**कल्याणी** : तोच विचार कायम करा म्हणावं.

**शिरसाट** : अहो, इतकीं वर्षं जीव लावलेला छापखान्याला. मालकांच्या तोंडून देखील या शिरसाटाचं नांव जाणार नाहीं.

**कल्याणी** : मारूं द्या हांका त्यांना तुमच्या नांवानं थोडे दिवस. शिरसाटा-ऐवजीं दुसरा कुणी पिसाट आला त्या जागीं, म्हणजे विसर पडेल त्यांना तुमचा! तुम्हीं नका काळजी करूं त्यांची! आतां अशी नोकरी बघा, कीं तिथल्या-पेक्षां घरीं बायकामुलांच्या संगतींत तुम्हांला जास्त वेळ काढतां येईल. जा—

**शिरसाट** : नाहींच ऐकत तर तुम्हीं? दुर्दैव या शिरसाटाचं! आतां घरीं हें तोंड घेऊन गेलों—

**कल्याणी** : कीं तुमचीं अकरा मुलं आणि दोन बायका उड्या मारायला लागतील आनंदानं!—पहा तर खरं! मग तुम्हींच म्हणाल—हा शिरसाट आतां खरा सुखी झाला!—जा.

[ शिरसाट मलूल मुद्रेनें जाऊं लागतो, पण दरवाजाबाहेर जाऊन परत पळत येतो. ]

**शिरसाट** : लपवा—लपवा मला.

**कल्याणी** : काय झालं ?

**शिरसाट** : अहो, मालक येताहेत.

**कल्याणी** : भाऊकाका ?

**शिरसाट** : हो, या शिरसाटाला त्यांनीं इथं पाहिलं, तर भलतंच कांहींतरी समजतील !

**कल्याणी** : काय समजतील ? तुम्हांला दोन बायका आहेत, हे माहीत आहे ना त्यांना ?

**शिरसाट** : हांय हो—पण—पण मी या पार्टिशनच्या आड लपतों. ते आंत आले कीं निघून जाईन. तुम्हीं मात्र त्यांना सांगू नका कीं—

[ हणमंतराव येतात. त्यांचा चेहरा अत्यंत चिंताक्रांत दिसतो. त्यांच्या हातांत काठी आहे. ती टेंकीत ते येतात. ते पुढें आल्यावर शिरसाट पार्टिशनच्या आडून लपत लपत दरवाजा कडे जाऊं लागतो. ]

**कल्याणी** : अहो शिरसाट, पाणी हवं होतं ना तुम्हांला प्यायला ?

[ शिरसाटाची बोबडी वळते. हणमंतरावांकडे पाहाण्याचा त्याला धीरही होत नाहीं. तो नुसता मानेनेंच नको म्हणून तेथून पळ काढतो. ]

**हणमंत** : शिरसाट कशाला आला होता ?

**कल्याणी** : मुंबईला साखर कशी मण मिळते, तें विचारायला आले होते !

**हणमंत** : तुझ्याकडे ?

**कल्याणी** : हं—तुम्ही कसे वाट चुकलांत इथं ? कुणी पाहिलं तर—

**हणमंत** : हॉटेल आहे हें. इथं यायला कशाला भ्यायला हवं ?

**कल्याणी** : हो, खरंच. काय झालं बाटाघाटींचं ?

**हणमंत :** तुला कसं कळलं ?

**कल्याणी :** जयंता याच हॉटेलांत राहातो.

**हणमंत :** याच खोलींत ?

**कल्याणी :** अहं; शेजारच्या. संप मिटला का ?

**हणमंत :** तें जयंताच्या हातीं आहे. त्याला म्हटलं, तूं सांगशील त्या अटी पाळायला मी तयार आहें. माझी एकच गोष्ट तूं ऐक.

**कल्याणी :** कसली ?

**हणमंत :** अबूशीं लग्न करायची.

**कल्याणी :** संपाचा आणि लग्नाचा काय संबंध ?

**हणमंत :** एरव्हीं नव्हता—पण तूं आल्यामुळं तो उपस्थित झाला.

**कल्याणी :** छान; मी तर तुमचा छापखाना काळा कीं गोरा पाहिलेला नाहीं.

**हणमंत :** पण अंबूच्या लग्नाचा प्रश्न तरी तुझ्यामुळें बिकट झाला ना ?

**कल्याणी :** तो कसा काय ?

**हणमंत :** तूं आल्यामुळं जयंता आणखी बिथरला आहे.

**कल्याणी :** काय म्हणतो तो ?

**हणमंत :** म्हणाला, मी अंबूशीं प्राण गेला तरी लग्न करणार नाहीं.

**कल्याणी :** मग मी काय करूं ?

**हणमंत :** तुझ्याकडे त्याच्या मनाचा फार ओढा दिसतो मला.

**कल्याणी :** मग मी पसंत नाहीं तुम्हांला ? [ हणमंतराव तिच्याकडे पाहात राहातात. त्यांच्या तोंडून शब्दही फुटत नाहीं. ] तशी कांहीं मी वाईट मुलगी नाहीं. बी. ए. झालें आहें. चहा करतां येतो मला. स्वयंपाक करायचा कधीं प्रसंगच आला नाहीं. फारच लाडांत वाढवलं मला आईनं. घरांत वडील असते म्हणजे माझे इतके लाड केले नसते आईनं—नाहीं ? पण बापावेगळी मुलगी म्हणून मारीच लाड केले तिनं माझे. पण त्यामुळं मी

बिघडलें नाहीं हं. विचारा तुमच्या जयंताला. त्यालादेखील अजून चार हात दूर ठेवला आहे. नाहींतर आमची इतकी मैत्री !

**हणमंत :** हो, ती मैत्रीच आड येते आहे या लग्नाच्या.

**कल्याणी :** खरं का ? पण आजच्या सुधारलेल्या जगांत लग्न झालेल्या स्त्री–पुरुषांची इतर स्त्री–पुरुषांशीं मैत्री ही असणारच.

**हणमंत :** आपल्या हिंदुस्थानांत नाहीं पचायची ही गोष्ट.

**कल्याणी :** हिंदुस्थानांत मैत्रीचे नियम निराळे आहेत आणि विलायतेंत निराळे आहेत वाटतं ? उलट, हिंदुस्थानांत ज्याला पाप समजतात त्या गोष्टी तिथं लहान मुलांनादेखील समजावून सांगण्यांत येतात. त्यामुळं उठल्या-सुटल्या प्रत्येक गोष्टीकडे कुतुहलानं, विकृत दृष्टीनं पाहाण्याची तिथल्या लहान मुलांनादेखील संवय नसते. इथं तर तुम्हांलादेखील आत येतांना प्रथम कसंसंच वाटलं असेल !

**हणमंत :** मुळींच वाटलं नाहीं मला. मी कांहीं कुणा परक्या स्त्रीच्या घरांत पाऊल टाकीत नव्हतों.

**कल्याणी :** म्हणजे एका दिवसाच्या ओळखीनं मी तुम्हांला तुमच्या घरांतली मुलगी वाटूं लागलें कीं काय ? [ हसूं लागते. ]

**हणमंत :** कल्याणी, हसूं नकोस अशी. मला काय होतं आहे कळत नाहीं —पण तुझ्याबद्दल—तुझ्याबद्दल कांहीं तरी वेगळीच ओढ लागते आहे मनाला खरी.

**कल्याणी :** शुः—शुः—बरं नव्हे हें. कुणी ऐकलं तर काय म्हणेल ?

**हणमंत :** [ गांगरून ] म्हणजे त्या अर्थानं नाहीं म्हणालों.

**कल्याणी :** नसेल.—पण तुमच्यासारख्या एका सभ्य, कुलीन गृहस्थानं, एका वर्तमानपत्राच्या प्रतिष्ठित संपादकानं, माझ्यासारख्या एका अकुलीन घराण्यांतल्या मुलीबद्दल असे आपुलकीचे उद्गार काढणं—छेः—माझ्या अंगावर तर कांटाच येतो ! लोक काय म्हणतील ?

**हणमंत** : काय म्हणणार? मला म्हातारचळ लागला आहे, असं म्हणतील! मी केवढा, तूं केवढी—मला तूं मुलीसारखी—

**कल्याणी** : मुलीसारखी?—छेः छेः छेः—हें तर अगदींच वाईट! अहो, मी तुम्हाला मुलीसारखी म्हणजे माझी आई तुम्हांला बायकोसारखी नाहीं का होणार? [ हंसते. ] तुम्हीं संपादक असतांनादेखील बोलतांना इतके कसे घसरतां हो? [ एकदम आठवल्यासारखं करून ] खरंच, भाऊकाका, तुम्हीं कधीं गाण्याबजावण्याचा षोक केला आहे का हो?—पूर्वी—तरुणपणीं?

**हणमंत** : कां विचारतेस मला?

**कल्याणी** : तस नव्हे—माझी आई केव्हां केव्हां म्हणेत, आपण तरुणपणीं गात असूं तेव्हां बरींच चांगलीं चांगलीं प्रतिष्ठित माणसंदेखील गाणं ऐकायला येत. त्यांपैकीं कांहीं तिच्या ओळखीचींही झालीं होतीं म्हणे!—पण तुम्हीं कॉंग्रेसचीं माणसं! तुम्हांला कसलं गाणं नि बजावणं माहीत असणार! त्यावेळीं तुम्हीं चरख्यावर नाहींतर टकळीवर सूत काढण्यांत दंग असाल!

**हणमंत** : असंच कांहीं समजूं नकोस. मला खूप षोक होता पूर्वी गाण्याबजावण्याचा.

**कल्याणी** : असं का? कुणाकुणाचं गाणं ऐकलं तुम्हीं?—म्हणजे बायकांपैकीं!

**हणमंत** : गोहरजान, मलकाजान, पुण्याची सुंदराबाई, मुंबईच्या अंजनीबाई मालपेकर, ताराबाई शिरोडकर, यांचंही ऐन अमदानींतलं गाणं ऐकलं आहे मी. शिवाय, गाणं ऐकायला खूप बायकांकडे जात असूं मी आणि आमचा दामुअण्णा. त्याच्यामुळंच मला हा षोक लागला होता म्हणेनास!

**कल्याणी** : अस्सं. मग माझ्या आईचं गाणंही ऐकलं असेल नाहीं तुम्हीं?

**हणमंत** : काय नांव तिचं?

**कल्याणी :** दामुअण्णांनीं नाहीं सांगितलं तुम्हाला ? त्यांनीं तर माझ्या चेहऱ्यावरुन माझ्या आईला ओळखलं.

**हणमंत :** हो—तो म्हणाला होता, मेनकेची मुलगी तूं म्हणून. पण कुठली मेनका, तें जरा ध्यानांत येत नाहीं. त्या नांवाच्या बऱ्याच बायका आहेत तुमच्या जातींत.

**कल्याणी :** फोटो दाखवूं का ?

**हणमंत :** आहे का तुझ्याजवळ ?

**कल्याणी :** हो—पण आईनं सांगितलं आहे, कीं तुझा बाप भेटला तरच त्याला आपला फोटो दाखव.

**हणमंत :** पण त्याची तरी ओळख कशी पटणार तुला ?

**कल्याणी :** त्याचाही फोटो-आईनं दिला आहे ना माझ्याजवळ.

**हणमंत :** ( अधीरतेनें ) पाहूं—पाहूं—

**कल्याणी :** ( हंसून ) छान—काल नांव विचारीत होता, आज फोटोच पाहायला मागतां आहां !—अहं, मी नाहीं ग बाई त्याचं रहस्य फोडायची ! किती झालं तरी मला जन्म दिला आहे त्यानं. त्याच्या नांवाचा स्फोट करून त्याची जगांत बेअब्रू करायची म्हणजे—छेः छेः—चहा घेतां का ?

**हणमंत :** मला चहा नको आणि सरबतही नको—उगीच असं विषयांतर करूं नकोस. तुझ्या बापाचा फोटो पाहिला म्हणून त्याच्या नांवाचा स्फोट करीन असं तुला वाटत असलं, तर—तुला वचन देतों. मी तो फोटो पाहिल्यानं कांहीं त्याची बेअब्रू होणार नाहीं.

**कल्याणी :** तुम्हांला माहीत नाहीं भाऊकाका, आपल्या इकडे अब्रू—बे-अब्रूचा प्रश्न इतका विचित्र झाला आहे म्हणून सांगूं ! एखादा बडा माणूस भर समारंभांत कुठल्या तरी एखाद्या बाईला घेऊन आला, तर लोक तोंडून एक ब्र काढीत नाहींत. तेंच तुमच्यासारखा एखादा माणूस

आमच्या घरांतून बाहेर पडतांना पाहिला तर तुमच्याबद्दल काय नाहीं नाहीं त्या कंड्या उठवतील!

**हणमंत** : मलाही कळत ते. म्हणून तर तुला म्हटलं, कीं मला तुझ्या बापाचा फोटो दाखवण्यापासून कांहा तोटा नाहीं. उलट, तो पाहून मी त्याचा ठावठिकाणा देखील तुला कदाचित् सांगूं शकेन.

**कल्याणी** : पण मी त्याला भेटूनदेखील आलें.

**हणमंत** : अस्सं?—तुला ओळखलं त्यानं?

**कल्याणी** : तो कसा ओळखणार! माझा जन्म झालेला देखील त्यानं पाहिला नाहीं. त्यापूर्वीच तो पळून गेला होता.

**हणमंत** : मग त्याला कशी काय ओळख पटली तुझी!

**कल्याणी** : माझ्या चेहऱ्यावरून. मुलांच्या चेहऱ्यांत आईबापांच्या चेहऱ्यांचं कुठं ना कुठं साम्य आढळतंच. नाहींतर मला वाटतं, पुरुषांची हात झाडून मोकळ होण्याची वृत्ति आणखी बळावली असती!

**हणमंत** : मग काय म्हणाला तो? तुला आपली मुलगी मानायला तयार झाला?

**कल्याणी** : कसा होईल? अहो, त्याला अस्सल लग्नापासून झालेला एक मुलगा आहे!——चांगला मोठा मुलगा आहे—तुमच्या जयंताएवढा! त्याला कस हें सांगायचं? कुठला बाप आपल्या तोंडानं आपलं पूर्वचरित्र मुलाला सांगणार? आपल्याकडे बापलेकांचे संबंध कसे असतात—पाहिले आहेत ना तुम्ही?—बाकी तुम्ही पाहातांच आहां म्हणा!

**हणमंत** : मग तूं अशीच परत जाणार तर!

**कल्याणी** : मग काय मी त्याच्याजवळ कायमची राहायला आलें आहें? तो म्हणाला, तरी मी राहिलें नसतें. मुंबईला माझी आई एकटी आहे; आणि त्यांत आजारी पडली आहे. तिला माझ्याशिवाय कोण आहे आणखी? त्याला एकदां डोळे भरून पाहून घेतलं—पुरे झालं. नुसती

एक जिज्ञासा होती, एवढंच.——आणि तो तरी मला आपल्यापाशीं राहा म्हणून कसा सांगणार? घरांत मोठा मुलगा——चांगला तुमच्या जयंताएवढा. त्याला मी कोण हें जर माहीत नसलं, तर तो प्रेम करायला लागायचा कीं माझ्यावर! म्हणजे आली पंचाईत!

**हृणमंत :** त्यापेक्षां त्यानं आपल्या मुलाला स्पष्ट काय तें सांगून कां टाकूं नये?

**कल्याणी :** तुम्हीं सांगितलं असतं?

**हृणमंत :** कुणाला——जयंताला?

**कल्याणी :** हं.——सांगून टाका पाहूं त्याला——

**हृणमंत :** काय?

**कल्याणी :** कीं, जयंता——ही पहा माझी मुलगी! वीस वर्षांपूर्वी माझ्या हातून घडलेल्या पातकाचं हें पहा फळ! वीस वर्षं हिला आपला बाप कोण हें माहीत नव्हतं——जगांत हिला फक्त आपली आई माहीत होती. बापाचं सुख वीस वर्षांत हिला मिळालं नाहीं——बाप असून बापाचा हिला आजपर्यंत पत्ता नव्हता. बापानं हिला कधीं अंगाखांद्यावर खेळवलं नाहीं——कधीं कडेवर घेऊन मिरवलं नाहीं. वर्षांमागून वर्षं काढीत ही वीस वर्षांची झाली. लहानपणी मैत्रिणींच्या घरीं त्यांच्या वडलांना पाहून ही आपल्या आईला विचारीत असे, कीं माझे बाबा कुठं आहेत? मोठेपणीं शाळेंत आणि कॉलेजांत बापाचं नांव सांगतां येत नाहीं, याचं शल्य सहन करीत आली. हिचं सारं शिक्षण, सारं ज्ञान, साऱ्या भावना या एका उणीवेपायीं जळून जळून खाक झाल्या——अशी ही माझी मुलगी——[ एकदम हातांतला फोटो त्याच्या डोळ्यांपुढं धरून ] आणि ही तुझी आई!

**हृणमंत :** [ फोटोकडे लक्ष जाऊन एकदम ] म्हणजे——कल्याणी——

**कल्याणी :** भाऊकाका——[ एकदम त्याच्या कुशींत तोंड खुपसून ] भाऊकाका,——

**हृणमंत :** कल्याणी——माझी कल्याणी——

**कल्याणी :** भाऊकाका — बाबा — अण्णा — नाना — भाऊकाका, कुठल्या नांवानं हाक मारूं मी तुम्हांला ?

**हणमंत :** कल्याणी—माझी—कल्याणी—

[ जयंता येतो व त्यांना त्या स्थितींत पाहून स्तंभित होतो. ]

**जयंता :** कल्याणी !

[ त्याचा आवाज ऐकून दोघेही परस्परांपासून वेगळीं होतात. जयंता त्या दोघांकडे आळीपाळीनें पाहात तसाच उभा राहतो. हणमतराव त्याच्या डोळयाला डोळा न भिडवितां खुर्चीवर बसतात. कल्याणी एकदां त्याच्याकडे व हणमंतरावाकडे पाहून एकंदर परिस्थितीचा क्षणांत अंदाज घेते आणि एकदम आपला चेहरा बदलते. ]

**कल्याणी :** काय रे जयंता, तुला कांहीं मॅनर्स ? खुशाल आपला एकदम खोलींत शिरतोस ! अगदीच कम्युनिस्ट आहेस ! बाईमाणूस मी–कुठल्या स्थितींत बसलें असेन, पडलें असेन याची कांहींच जाणीव असलेली दिसत नाहीं तुला !

**जयंता :** या स्थितींत तुला पहावं लागणार होतं, हें मला आधीं कळतं तर बाहेरून दरवाजा लावून घेतला असता मी !

**कल्याणी :** पण पाहिल्याशिवाय आधीं कसं कळलं असतं तुला ? [ हंसते. ] बरं, तें जाऊं दे. काय झालं तुझ्या वाटाघाटीच ?

**जयंता :** आधीं तुझ्या ह्या वाटाघाटीचा अर्थ मला सांग.

**कल्याणी :** अरे वा ! अगदीं नवरा असल्यासारखा हुकूम करतो आहेस कीं मला !

**जयंता :** [ आवाज चढवून ] कल्याणी !

**कल्याणी :** [ त्याच आवाजांत ] जयंता !—पहा तुझ्यासारखंच दरडावलं कीं नाहीं तुला !—भाऊकाका, तुम्हीं याच्या खोलींत बसा थोडा वेळ.

शेजारींच आहे खोली याची. मला जरा याच्याशीं बोलायचं आहे, [ हणमंतरीव उठतात व जयंताकडे लक्षही न देतां जाऊं लागतात. कल्याणी त्यांना दरवाजापर्यंत पोंचवते व परत येते. ] हं-काय म्हणणं आहे तुझं ?

**जयंता** : कांहीं नाहीं.

**कल्याणी** : अरेच्चा ! मग भाऊकाकांना जायला कशाला सांगितलं मी ? आणतें तर बोलावून त्यांना

**जयंता** : कल्याणी, तूं काय ही थट्टा आरमली आहेस ?

**कल्याणी** : थट्टा ? कुठं ? काय म्हणतोस तूं ?

**जयंता** : भाऊकाका कशाला आले होते इथं ?

**कल्याणी** : छान ! अरे, तुझे वडील ते-आणि विचारतोस का आले होते !

**जयंता** : माझे वडील म्हणून ते आले होते ?

**कल्याणी** : समज, दुसऱ्या कुठल्या उद्देशानें आले होते—काय म्हणणं आहे तुझं ! तूं काय माझा नवरा आहेस ? कधीं एका शब्दानं म्हटलं नाहींस, कीं कल्याणी, तुझ्यावर माझं प्रेम आहे.—म्हटलं आहेस कधीं ?

**जयंता** : हें तोंडानं म्हणावं लागतं ? हें काय नाटक आहे ?

**कल्याणी** : अरे, अलीकडे नाटकांत असं लिहीत नाहींत; प्रेक्षक हंसायला लागतात असं कांहींतरी नाटकी लिहिलं कीं ! तूं रांगणेकरांचीं नाटकं पाहात नाहींस का !

**जयंता** : जहान्नममध्यें गेला तो ! मला आधीं माझ्या प्रश्नाचं उत्तर दे.

**कल्याणी** : काय प्रश्न आहे तुझा ?

**जयंता** : भाऊकाका इथं का आले होते ?

**कल्याणी** : तूं इथं का आला आहेस ?

**जयंता** : मी आणि भाऊकाका सारखेच ?

**कल्याणी :** माझ्या दृष्टीनं—माझ्या आईच्या दृष्टीनं—माझ्या आजीच्या दृष्टीनं—माझ्या जातीच्या दृष्टीनं सारखेच !

**जयंता :** म्हणजे ? काय म्हणते आहेस तूं हें ?

**कल्याणी :** अगदींच कसा रे तूं कम्युनिस्ट ? मी कोण आहे ? माझी जात कुठली ? आमच्या जातीचा धंदा कुठला ?

**जयंता :** तुला वेड तर लागलं नाहीं, कल्याणी ?

**कल्याणी :** वेड मला लागलेलं नाहीं—तुला लागलं आहे. तुझ्यासारख्या पिसाट तरुणांनीं उगाच आमचं स्तोम माजवून ठेवलं आहे ! म्हणे शिक्षणानं सुसंस्कृतपणा येतो, उच्च ज्ञान येतं, उच्च अभिरुचि निर्माण होते, हें होतं नू तें होतं ! कांहीं होतं नाहीं. अरे, चांगल्या बी. ए. नू एम्. ए. झालेल्या घरंदाज बायका—काय सांगूं तुला ? मुंबईला होतासच तूं. त्या जर अशा—तर मी काय, बदफैली ठरलेल्या जातींत जन्म घेतलेला ! शिकलें म्हणून काय झालं ? मूळचं पाणी थोडंच जातं !—तूं सांग आपला, काय काय झालं तूं गेला होतास तिथं ?—बोल कीं रे ? असा "नर्व्हस" होऊं नकोस. मग मला गळा काढून रडावंसं वाटतं !—छेः बाई ! तुम्हीं सारे पुरुष असेच. आम्हा बायकांपेक्षां भावनाशील ! तुला आतां "मूड" मध्यें आणायचं म्हणजे—हां—आपलं तें नेहमींचं गाणं म्हणूं का ? तें ऐकलं, कीं तुझ्या वृत्ति कीं काय त्या बहरून येतात—असं तूं कायसंसं म्हणतोस नाहीं का केव्हां केव्हां ! छान—बस असा. [त्याला खुर्चीवर बसवते. ] ऐक आतां [ खांकरते ] दरवाजा लावून घेऊं का रे ? —पण नको. भाऊकाका आले आणि त्यांनीं दरवाजा बंद पाहिला, तर तुझ्या-सारखंच तेही मला दरडावून विचारतील, "कल्याणी, याचा अर्थ काय ?"

[ हंसते. नंतर गाणें म्हणते ]

**कल्याणी :—**

कां रे ऐसी माया। कान्हा। लाविली मला ॥
क्षणभरी सोडुनी दूर तुला।
राहिना कसा जीव पहा। कां रे सांग राजसा॥ धृ० ॥
किती समयीं जरी झाला अबोला।
जडतो कां तरी छंद तुझा हा।
ना जाणे कशी वेल्हाळा। झाली वेडी राधिका ॥ १ ॥

[ जयंताचें गाण्याकडे लक्षही नसतें. त्याच्या अंतःकरणांत केवढें वादळ चाललें आहे, याची कल्पना त्याच्या चेहऱ्यावरून येते. मात्र त्याच्या तोंडून प्रयत्नानेंही शब्द फुटत नाहीं.

**कल्याणी :** [ गाणें संपल्यावर ] हं—बोल आतां.

**जयंता :** [ अनावर संतापानें ] काय बोलणार—कपाळ ? तू अशी असशील याची मला कल्पना असती—

**कल्याणी :** [ शांतपणानें ] तर काय केलं असतंस ? माझा संबंध तोडला असतास—हेंच कीं नाहीं ? आतां तोडून टाक.

**जयंता :** तुला त्याचं कांहींच सुखदुःख नाहीं !

**कल्याणी :** छे: आमचा सगळाच व्यवहार तात्पुरता—" टेंपररी ". जन्माचे ऋणानुबंध आमच्या जातींत जडत नसतात. आमची जात देवानं जन्माला घातली आहे ती पुरुषजातीची सेवा करायला—एकाच पुरुषाची नव्हे; सर्वच पुरुषजातीची. सगळे धर्म, पंथ, पक्ष आमच्या घरीं एकोप्यानं नांदतात. आमच्या जातीचा उद्धार करण्याच्या हिरीरीनं तुझ्यासारखे कांहीं भोळेभाबडे तरुण प्रयत्न करतांना दिसतात, तेव्हां आम्हाला हंसूच येतं.

इतर जातींतल्या बायकांचे नियम आम्हांला लावूं पाहाण्यांत काय अर्थ ! कोंबड्यांना अंगणांतच फिरूं दिलं पाहिजे; त्यांना कुणी पलंगावर नेऊन बसवायला लागला तर त्या तिथं राहातील का ?

**जयंता :** तुझ्यासारख्या शिकलेल्या बायकांची या विसाव्या शतकांत ही विचारसरणी—मग—

[ पुढें त्याच्या तोंडून शब्दच फुटत नाहीं ]

**कल्याणी :** विसाव्या शतकांत ? अरे वेड्या, चाळिसाव्या शतकांत तूं मला परत भेटलास, तरी त्यावेळीं तुला आमच्या जातीबद्दल हेंच ऐकवीन मी ! आम्हीं म्हणजे समाजाचा एक अत्यंत आवश्यक घटक आहों. भंग्यांना आणि महारांना सुधारून चालेल का ? मग त्यांचे आजचे अत्यंत महत्त्वाचे उद्योग कुणीं करायचे ? ज्या कारणासाठीं जी जात निर्माण झाली आहे तिनं त्याच जागीं शतकानुशतकं राहिलं पाहिजे. तोच त्यांचा संसार, तेंच त्यांचं जिणं आणि तोच त्यांचा मोक्ष ! तूं नको उगीच वाईट वाटून घेऊं.—चहा आणायला सांगू का ?

**जयंता :** पाणी देखील प्यायचं नाहीं मला इथं. [ जाऊं लागतो. )

**कल्याणी :** अच्छा—बाय् बाय्.

**जयंता :** [ परत वळून येऊन ] कल्याणी—

**कल्याणी :** काय रे ?

**जयंता :** तूं जें सारं बोललीस—जें मीं पाहिलं तें सारं खरं समजूं ना ?

**कल्याणी :** ऐकलेल्या गोष्टी खऱ्या मानू नये म्हणतात.—आतां पाहिलेल्या गोष्टीवर विश्वास ठेवायचा कीं नाहीं, हा ज्याचा त्यानं विचार केलेला बरा नाहीं का ?

**जयंता :** एरव्ही विश्वास ठेवला नसता. पण—पण जें पाहिलं तें मीं खरं मानावं, असाच तुझा मघांपासून प्रयत्न चालला आहे.

**कल्याणी :** मग काय लग्नाच्या बायकोसारखं तुला फसवायच नाटक करूं ? जें तूं पाहेलंस तें आपल्या डोळ्यांनीं पाहिलंस—

**जयंता :** पण आजपर्यंत तुझ्या बाबतींत असला घाणेरडा प्रकार घडलेला पाहिला नव्हता.

**कल्याणी :** कुठं पहाणार ? मी मुंबईत—तूं पुण्यांत. मी तिथं काय करीत असतें, याची तुला इथं बसून काय कल्पना येणार ? बरं, तूं मुंबईला येतोस त्यावेळीं कांहीं तुला दिसल नाहीं, म्हणून तू असं म्हणतोस.

**जयंता :** म्हणजे तुझं म्हणणं तिथंदेखील तूं अशीच वागतेस ?

**कल्याणी :** [ हंसून ] किती बावळट आहेस रे तू ? अरे, मला काय सीता, सावित्री, तारा, मंदोदरी यांपैकीं कुणी समजलास ? त्या पतिव्रता होत्या, माझं अजून लग्नदेखील झालेलं नाहीं. लग्नानंतर देखील पुरुषांत राम आणि बायकांत सीता सांपडतांना पंचाईत, तिथं मी तर अजून कुंवार. एवढ्यांतच पातिव्रत्याचा उठाठेव करायला सांगतोस कीं काय तू मला ! शाब्बास ! बऱ्याच मोठ्या अपेक्षा दिसतात तुझ्या माझ्या बाबतींत !

**जयंता :** यापुढं कांहीं अपेक्षा ठेवीत नाहीं. जमीनदोस्त करून टाकल्यास तूं साऱ्या. पण तूं एवढंच लक्षांत ठेव, तूं आज तुझा एक खराखुरा मित्र गमावलास. [ जाऊं लागतो. परत वळून ] आणखी एक तुला सांगायचं आहे.

**कल्याणी :** आश्विनशेट असाच येतो नाहीं पुन्हां पुन्हां "संशयकल्लोळ" नाटकांत !

**जयंता :** तूं या गोष्टीला नाटकापेक्षां जास्त किंमत देत नसशील. पण माझ्या वेगळ्याच योजना धुळीला मिळवल्यास तूं.

**कल्याणी :** काय बेत होता तुझा ? तुझ्या कम्युनिस्ट पार्टीची सेक्रेटरी करणार होतास कीं काय मला ? [ हंसूं लागते. ] हें बघ, मी तर तुझ्या त्या पार्टींत नाहींच कधीं येणार. पण तूंदेखील राजिनामा दे आणि भाऊ-काकांना म्हातारपणीं मदत कर.

**जयंता** : ही रदबदली करायला सांगण्यासाठींच आले होते वाटतं इथं ?

**कल्याणी** : त्यांनीं नाहीं मला कांहीं सांगितलं—मी तुला सांगतें आहें. अरे, सगळ्याच भांडवलशाहीच्या नांवानं ओरड करण्यांत काय अर्थ आहे ? कुठल्याही संघटनेला भांडवल हें लागतंच. तुमची कम्युनिस्ट पार्टी आज एवढी दरिद्री आहे; तिला जर पाठीशीं भांडवलवाले मिळाले, तर ती देखील कॉंग्रेसारखीच फोफावणार नाहीं का ? तुझ्यावरूनच पहा. आज तू सारं पार्टीचं काम करतो आहेस.—कुणाच्या जिवावर ? तुझ्या भाऊ-काकांच्या ते तुला जेऊ-खाऊं घालताहेत—राहायला जागा देताहेत—तूं देखील त्यांच्या भांडवलावरच पोसला जातो आहेस !

**जयंता** : आतांपर्यंत होतों—आतां मी घर सोडलं आहे.

**कल्याणी** : आणि हॉटेलांत येऊन राहिला आहेस ! हॉटेलचं बिल कोण देणार ? तुझी कम्युनिस्ट पार्टी देणार आहे का ? आहे का तिच्याजवळ एवढा पैसा तुझ्यासारख्या सगळया पुढाऱ्यांचा जन्मभर हॉटेलखर्च भाग-वण्याइतका ? तुमचा मोठ्या भांडवलवाल्यांविरुद्ध सामना चालला आहे; पण तो छोट्या भांडवलवाल्यांच्या मदतीन ! एकूण काय—सान्याच ठिकाणीं भांडवलशाही आहे. तू माझं ऐकशील, तर आतां घरीं जा. तिथं बिचारी अंबू तुझ्यावर जीव टाकून बसली आहे. इतका जीव टाकूं नये बायकांनीं नवऱ्यावर खरं म्हटलं तर !—नवरे माजतात ! मी सांगतिलं आहे हें तिला. पण तिला पटत नाहीं. भावडी आहे बिचारी ! पण ती तुझा संसार सुखी करील.

**जयंता** : मोठा आजीबाईचा आव आणून सगळ्यांना उपदेश करायला निघाली आहेस—ती तूं स्वतःबद्दल कांहीं विचार केलास ?

**कल्याणी** : माझ्याबद्दल काय विचार करायचा ? मी का कुणासाठीं अंबू-सारखी तळमळतें आहें, का माझ्यासाठीं कुणी तळमळतो आहे !—तूं आणि मी इतके दिवस फ्रेंड्ससारखीं वागतों आहों. आपली ही मैत्री जन्मभर टिकेल.

मी अंबूलादेखील सांगितलं आहे. अरे, मैत्रीची गोडी काय लग्नांत असते ? तुम्हीं पुरुष काय आणि आम्हीं बायका काय—आपल्या नवऱ्यापासून आणि बायकोपासून लपवून ठेवलेल्या गोष्टी मित्रांकडे आणि मैत्रिणींकडे अंतःकरण उघडून सांगत असतों. अशी मैत्री तुला माझ्याशीं जन्मभर ठेवतां आली तर ती तुला नको आहे का ? पहा—बायकोपेक्षा-देखील मी तुला जास्त जिव्हाळा लावीन.

**जयंता :** लावशील—तूं ज्या जातींत जन्मल्याचं भूषण मानतेस, त्या जातींत तूं असा जिव्हाळा लावण्याची कला शिकली आहेस खरी ! मला लावशील—भाऊकाकांना लावशील—आणखी कुणी भेटला तर त्यालाही लावशील—

**कल्याणी :** अगदीं बरोबर. आतां कसा शहाणा झालास ? माझ्या अंगीं उगीच सद्‌गुणांचीं पिसं चिकटवूं नकोस. भाऊकाका काय—तूं काय—सारे पुरुष मला सारखे ! अगदीं हीन, अधम, नालायक आहें मी असं समज.

**जयंता :** समजण्याची काय आतां जरुरी उरली आहे ? खात्रीच झाली. माझ्यावर जीव टाकणारी तुझी आईदेखील तुझ्यासारखीच—

**कल्याणी :** [ मध्येंच ] हां हां—आईबद्दल मात्र एक अक्षर बोलूं देणार नाहीं मी तुला. ती तुला मुलासारखा वागवते—अगदीं मनापासून. तुझी आई जिवंत असती, तर ती माझ्या आईएवढीच नसती का ? मी आतां मुंबईला गेल्यावर तिला सांगणार आहें, तुझा मुलगा लवकरच तुझ्या सुनेला घेऊन येणार आहे तुझ्या पायां पडायला ! [ हंसते ]

**जयंता :** [ बेफामपणें ] मुलगा—सून—आई—बाप—आणि—आणि तूं !

[ संतापानें निघून जातो. तो गेल्यावर इतका वेळ अंगांत आणलेलें धैर्य गळून गेल्याप्रमाणें ती खुर्चीवर बसते व शून्य मुद्रेनें कुठेंतरी पाहात राहाते. भाऊकाका येतात.

शेजारच्या खोलींत बसून तिच्या तोंडचा शब्दन् शब्द ऐकल्यामुळें त्यांच्या चेहऱ्यावर तिच्याबद्दलच्या असाधारण भावना स्पष्ट उमटल्या आहेत. ते येतात आणि एकदम तिच्यापुढें लोटांगण घालतात. ]

**हणमंत :** कल्याणी—कल्याणी—पोरी—तुझा बाप दिपून गेला ग! माझ्यापायीं कसला घाणेरडा आरोप स्वतःवर लादून घेतलास! काय सांगितलंस हें जयंताला! तुझा शब्दन् शब्द माझ्या कानांत पडत होता आणि माझं काळीज चरचर कापीत होता! कशाला—कशाला ही गंगा गढूळ केलीस?

**कल्याणी :** त्याचं वेड घालवण्यासाठीं—माझा छंद सोडण्यासाठीं. माझ्या डोक्यात त्यानं ही खुर्ची कशी घातली नाहीं, याचंच मला आतां आश्चर्य वाटतं आहे.—जाऊं दे. चला. मला आतां माझं सामान गोळा करूं दे.

**हणमंत :** कुठं चाललीस?

**कल्याणी :** माझ्या आईकडे नको का जायला मला? ती बिचारी आजारी पडली आहे तिथं!

**हणमंत :** वीस वर्षांनीं भेटलीस आणि असा चटका लावून जाणार तूं मला? नाहीं—नाहीं—मी आतां तुझ्यापासून दूर राहाणार नाहीं. वीस वर्षे राहिलों—यापुढें मीही दूर राहाणार नाहीं—आणि तुलाही दूर ठेवणार नाहीं.

**कल्याणी :** म्हणजे?

[ हणमंतराव कांहीं न बोलतां खुर्चीवर बसतात. ती त्यांच्या-कडे पाहात राहाते. ]

[ पडदा पडतो ]

# अंक ३ रा

[ हणमंतरावांचें घर, पहिल्या अंकांतील वर्णनाप्रमाणेंच एकंदर सजावट आहे. गेल्या अंकानतर तास–अर्ध्यातासाचा अवधि लोटला आहे. दामुअण्णा व अंबू बाहेरून येतात. ]

**अंबू :** अण्णा, तुम्ही उगीच आणलंत मला परत तिथून. मी अगदीं निश्चय करून गेलें होतें.

**दामुअण्णा :** अग, पण कल्याणीनं तुला सांगितलं ना, कीं मी जयंताला घरीं पाठवीन, तुझ्याशीं लग्न करायला त्याला आग्रह करीन—

**अंबू :** हो—आग्रह करणार ! तुम्हांला सगळं खरं वाटलं तिचं बोलणं. पण बायकांचं मन बायकाच चांगलं ओळखतात.

**दामुअण्णा :** तशी नाही ती, अंबे. मोठी तेज पोरगी आहे. आतां नायकिणीच्याच कुळांत जन्मली, त्याला नाइलाज आहे. पण इतकी हुषार, तल्लख पोरगी चांगल्या खानदानी घराण्यांत जन्मली असती, तर आमच्या सरकारनं तिला अमेरिकेंत नाहींतर रशियांत धाडली असती वकील म्हणून ! तुझ्यासारखी मिळमिळीत नाहीं ती ! मोठी तिखट !

**अंबू :** आणि फटकळ नाहीं का ? काय वाटेल तें बोलते तोंडाला येईल तें.

**दामुअण्णा :** कॉलेजचं वारं लागलं आहे—आणि त्यांतून घरांत वडिलधारं पुरुषमाणूस नाहीं, म्हणून जरा अवखळ झाली आहे. पण कांहीं म्हण अंबे, मोठी तेज पोरगी आहे. आपण तर खूष आहों तिच्यावर !

अंबू : हो, तुम्ही खूष असणारच. बायकांच्या जातीला इतकं उद्धट न् धीट असून चालत नाहीं म्हटलं.

दामुअण्णा : अग, आजच्या काळांतल्या बायका काय पूर्वीसारख्या शेळपट राहिल्या आहेत होय? हपिसं काय, सिनेमा काय, पोलिसखातं काय— बघावं तिथं आजकाल बायकाच बायका! त्यांतल्या त्यांत, बरं का अंबे, ह्या नायकिणींच्या मुली कीं नाहीं जरा जास्तच तल्लख असतात! मिश्रविवाह झालेल्या आईबापांची मुलं जशीं बहुधा हुषार निपजतात—तशापैकींच आहे हा प्रकार. बघून ठेवलं आहे मीं आज बरींच वर्षं.

अंबू : तरी बायकांचं मन तें बायकांचं मन. मला तर मुळींसुद्धां वाटत नाहीं ती सांगितल्याप्रमाणें करील म्हणून. त्यांची इतकी दोस्ती—माझ्यासाठीं ती थोडीच त्यांना झिडकारणार! कांहींतरी सांगितलं तिनं आणि तुम्ही आपली मला आणलीत तिथून.

दामुअण्णा : तिथं राहून तरी काय करणार होतीस? इथं सहा महिने झाले तरी त्याला तूं वठणीवर आणूं शकली नाहीस, ती चार दोन दिवसांत तिथं आणणार! थांब, जरा धीर धर. बघूं तरी, ती एवढी म्हणाली आहे—करीलही आपला शब्द खरा. अग, गाजराची पुंगी—वाजली तर वाजली, नाहींतर खाऊन टाकली!

अंबू : माझं मेलीचं मन तरी असं आहे—धड तोडूनही टाकतां येत नाहीं. म्हणजे ही कलकल तरी लागली नसती.

दामुअण्णा : तुम्हां बायकांना नाहीं तें जमायचं! मोठं चिवट मन असतं तुमचं रबरासारखं. ताणलं तरी तुटत नाहीं. आणि तोडायचं एकदां मनांत आणलंत म्हणजे प्रत्यक्ष ब्रह्मदेव आला तरी त्याची मात्रा चालायची नाहीं. पण ही मधली स्थिति फार वाईट! माझ्याही मनांत कधीं कधीं येतं—तुला सांगावं, कीं सोड जयंताचा नाद; तो कांहीं तुझ्या हाताला लागेल असं दिसत नाहीं. पण मी सांगून तूं थोडीच सोडणार त्याला! पाहूं आतां ही

पोरगी काय करते ती. जाण्यापूर्वी तुझ्या मनासारखं करीन म्हणाली आहे—तिचाही अनुभव येईल.

**अंबू :** पण आतां मात्र मी सांगून ठेवतें तुम्हाला—ती कांहीं न करतां तशीच निघून गेली, तर मी कांहीं इथं रहायची नाही यापुढं. तुम्हीं सांगा भाऊकाकांना—

[ हणमंतराव आणि त्यांच्यामागून कल्याणी येते. हणमंतराव आजूबाजूला न पहातां सरळ माडीवर जातात. कल्याणी अंबू व दामुअण्णांना पाहून थांबेत व त्यांच्याजवळ येते. ]

**दामुअण्णा :** आं—तुम्हीं कशा इथं ! आणि हणमंता कुठं भेटला तुम्हाला !

**कल्याणी :** कुठं म्हणजे ! हॉटेलांत.

**दामुअण्णा :** म्हणजे तिथं आला होता का ! म्हटलंच होतं मी तुम्हांला !

**अंबू :** हे नाहीं भेटले ?

**कल्याणी :** 'हे' होय ! आतां येतां येतां छापखान्यांतून भाऊकाकांनीं निरोप पाठवला आहे "ह्यांना" !

**दामुअण्णा :** इथं यायला ?

**कल्याणी :** हं.

**अंबू :** पण येतील का ते इथं ?

**कल्याणी :** देवाला नवस करा. बायकांच्या नवसाला देव पावतो म्हणतात. जन्मोजन्मीं तोच नवरा मिळावा म्हणून वटसावित्रीचं व्रत नाहीं का करीत बायका ?

**अंबू :** तुम्हीं आल्याचं कळलं तर येतील कदाचित्.

**कल्याणी :** छेः मी आल्याचं कळलं तर मुळींच यायचा नाहीं तो.

**दामुअण्णा :** असं कसं होईल ?

**कल्याणी :** मी तुम्हांला सांगितलं नव्हतं का, कीं मी त्याला शिकारीन.

**अंबू :** [ किंचित् दुःखित स्वरांत ] म्हणजे, खरंच झिडकारलंत की काय त्यांना ?

**कल्याणी :** हो.—आनंद झालेला दिसत नाहीं तुम्हांला ! हें हो काय दामुअण्णा ! यांच्यासाठीं मी त्याला झिडकारलं, आणि ह्या तर हिरमुसल्या झालेल्या दिसतात !

**अंबू :** तुम्हीं झिडकारण्यासारखं काय केलं त्यांनीं ! त्यांना किती वाईट वाटलं असेल !

**कल्याणी :** शाबास. ते माझ्याशीं चांगले वागले तरी तुम्हांला बरं वाटत नाहीं; आणि मी त्यांच्याशीं वाईट वागलें तरी तुम्हांला बरं वाटत नाहीं ! मोठा अजब स्वभाव आहे तुमचा !

**दामुअण्णा :** अहो, तसं नव्हे; तिचा भारी जीव आहे त्याच्यावर, तेव्हां तुम्हीं त्याला झिडकारल्यामुळं त्याचं मन दुखावलं म्हणून तिला वाईट वाटलं.

**कल्याणी :** पण मीं हें याच्यासाठींच केलं ना ! छान. म्हणजे शेळी जाते जिवानिशीं आणि खाणारा म्हणतो वातड—तशांतलाच प्रकार झाला हा ! छे: छे:, उगीच मी त्याला तोडलं.

**अंबू :** खरंच माझ्यासाठीं तुम्हीं अशा वागलां !

**कल्याणी :** मग माझा काय दुसरा फायदा ? तुम्हांला मी शब्द दिला तो खरा नको का करायला मला ? मी कांहीं लहान मुलांची समजूत काढतात तसं उगीच म्हणालें नव्हतें.

**दामुअण्णा :** ऐक अंबे, काय सांगितलं होतं तुला ! झाली आतां तुझी खात्री !

**कल्याणी :** म्हणजे यांना खरं वाटलं नाहीं मी म्हणाले तें ?

**अंबू :** कसं वाटेल ? मीही स्त्री आहें तुमच्यासारखी. आपल्याला आवडणारं माणूस कुणी स्त्री सुखासुखी देणार नाहीं दुसरीला.

**कल्याणी :** म्हणजे त्या दृष्टीनं मी असामान्यच म्हटली पाहिजे—खरं कीं नाहीं दामुअण्णा ? [ हंसते. ]

**दामुअण्णा :** बरं पण—तो येणार आहे का इथं ?

**कल्याणी :** हो, येईल असं वाटतं. कारण, भाऊकाकांनीं त्याला तसाच निकडीचा निरोप पाठवला आहे, कीं असशील तसा ये शेवटचा भेटायला.

**दामुअण्णा :** शेवटचा ? म्हणजे ?

**कल्याणी :** म्हणजे भाऊकाका चालले आज.

**दामुअण्णा :** कुठं ?

**कल्याणी :** मुंबईला—माझ्याबरोबर—माझ्या आईकडे.

**दामुअण्णा :** म्हणजे ?

**कल्याणी :** म्हणजे त्यांची आणि माझ्या आईची जुनी ओळख निघाली म्हणे—चांगली वीस-बावीस वर्षांपूर्वीची. तिचा फोटो त्यांच्या डोळ्यांपुढं धरतांच त्यांना सगळ्या आठवणी झाल्या आणि त्यांनीं मला आपल्या मुलीसारखं एकदम पोटाशीं धरलं.

**दामुअण्णा :** [ तोंडून शब्दही न फुटण्याच्या अवस्थेंत ] म्हणजे—तूं—तुम्हीं म्हणतां तरी काय ?

**कल्याणी :** आतां यापेक्षांही स्पष्ट शब्दांत सांगूं ?—ऐका तर. बावीस वर्षांपूर्वीं भाऊकाका माझ्या आईकडे येत—

**दामुअण्णा :** हो, माहीत आहे तें मला. माझ्याबरोबरच जायचा तो

**कल्याणी :** हो, पण तुम्हीं नुसतेच गाणं ऐकायला येत जात होतां; भाऊकाकांना माझ्या आईचा मोह पडला म्हणे. आणि माझा जन्म होण्यापूर्वीच त्यांनीं विश्वामित्रासारखा तिथून पोबारा केला. आईनं म्हणे तेव्हांपासून सारं कांहीं सोडलं. नंतरदेखील ती गाणीं करायची—पण घरांत पुरुषांची वर्दळ थांबली ती कायमचीच. मला तर फुलासारखं वागवलं तिनं. भाऊकाका

पुन्हां तिला कधीं भेटले नाहींत; पण ते केव्हांतरी आपण मरायच्यापूर्वी भेटतील, हा तिला जबरदस्त विश्वास. ह्या वीस वर्षांत भाऊकाकांनीं काय केलं, तें सारं तिला माहीत होतं. त्यांचं वर्तमानपत्र ती रोज भक्तिभावानें वाचीत असे. त्यांचं कुठं व्याख्यान झालं, तर तेंही वर्तमानपत्रांतून वाचीत असे, आणि जेव्हां कॉलेजांत माझी न् जयंताची ओळख झाली आणि तो घरीं यायला जायला लागला, तेव्हांपासून तर जणूं भाऊकाकांचीच पुन्हां भेट झाल्यासारखा आईला आनंद झाला. प्रथम प्रथम मला कांहींच कळत नसे. जयंतावर तिचा इतका जीव कां जडला, हेंच मला कळेना. मला तिनें काल–परवांपर्यंत कसलाच थांग लागूं दिला नव्हता.

**दामुअण्णा** : म्हणजे काल—परवांपर्यंत तुम्हांला तुमचं आणि जयंताचं नातं माहीत नव्हतं ?

**कल्याणी** : छेः पण आईला आज चार–आठ दिवस बरं वाटत नाहीं. तिला कसलं भय वाटतं आहे, कोण जाणे. पण परवां आपण होऊन तिनं मला जवळ बोलावून घेतलं आणि माझ्या जन्माचा सारा इतिहास सांगून टाकला.

**दामुअण्णा** : म्हणजे तुम्हीं हणमंताला घेऊन जायलाच आलां होतां म्हणायच्या ?

**कल्याणी** : हो—काय वाटेल तें करून आईची आणि त्यांची एकदा तरी भेट घडवून आणायच्या निश्चयानं मी आलें होतें. आई नको म्हणत होती; पण मला राहावेना. आणि माझा तो निश्चय सफळ झाला. माझ्या आईला इतका आनंद होईल म्हणून सांगूं ! बावीस वर्षांची तिची तपश्चर्या फळाला आल्यासारखं वाटेल तिला. जयंताला वाटलं, मी त्याच्याकडे आलें; पण खरं म्हणजे माझ्या बाबांना आईकडे घेऊन जायला आलें होतें मी !

**अंबू** : [ एकदम कल्याणीला मिठी मारून ] क्षमा करा मला !—आणि मी नाहीं नाहीं तो संशय घेतला तुमचा !

कल्याणी : पण तुम्हीं संशय घेतला यांत नवल तें काय ? माझी आणि जयंताची इतकी दाट मैत्री असलेली पाहून कांहींच वाटलं नसतं तुम्हांला, तरच नवल होतं !

दामुअण्णा : पण त्याला हें सारं माहीत आहे का ?

कल्याणी : छेः—अजून तरी नाहीं.

अंबू : केवढा धक्का बसेल त्यांना !

कल्याणी : मला नाहीं बसला ?

दामुअण्णा : म्हणजे तूं—तुम्हांला—

कल्याणी : आज दोन तीन वर्षांची मैत्री आमची, दामुअण्णा, आईलाही तो आवडूं लागल्यापासून तर मला फारच बरं वाटलं होतं. पण—जाऊं दे. आतां कशाला त्या गोष्टी ! माझ्या सुखापेक्षां मला माझ्या आईच्या सुखाची जास्त मातब्बरी वाटत होती. नाहींतर मी देखील माझ्या मनाला कदाचित् आवरून धरूं शकलें नसतें. कुठल्याही कुळांत जन्मल्या तरी स्त्रिया त्या स्त्रियाच ! ब्रह्मदेवानं स्त्रीजात घडवतांनाच ती अशी हलक्या हातानं घडवली आहे ! माझं मन मारायला मलाही कांहीं कमी यातना होणार नाहींत. —मी जातें माडीवर. भाऊकाकांचं सारं सामान आवरायला हवं.

दामुअण्णा : म्हणजे तो खरंच चालला कीं काय ?

कल्याणी : मग काय तुम्हांला खोटं वाटलं ?

दामुअण्णा : [ नाराज होऊन ] तसं नव्हे—पण—छेः छेः, असं कसं होईल ? आपलं घरदार सोडून तुमच्यासारख्यांच्या घरीं जायचं म्हणजे—काय वेडबीड लागलंय कीं काय त्याला ? कांहीं कुळाशीलाची लाज आहे कीं नाहीं त्याला ? तो जायला निघाला तरी मी जाऊं देणार नाहीं त्याला.

कल्याणी : खरं म्हणतां कीं काय ?

दामुअण्णा : मग काय मी थट्टेनें म्हणतों समजलांत ? अग, तुम्हीं बोलून चालून नायकिणी ! गाणं-बजावणं करतां, चार माणसं नादाला लावतां

आणि आपलं पोट भरतां—हें ठीक आहे. म्हणून काय हणमंतासारख्या घरंदाज, कुलीन, गृहस्थाला जन्माचं माणसांतून उठवायला निघालांत ! कुठं तो, कुठं तुम्ही ! गेला असेल चार दिवस तुमच्या घरीं मजेखातर—म्हणजे काय तुमचा तो जन्माचा बंदा झाला ? काय संबंध त्याचा न् तुमचा !—कुठं गेला तो ? मला त्याचे डोळे उघडलेच पाहिजेत.

[त्या आवेशांत दामुअण्णा माडीवर निघून जातात ! अंबूही त्यांच्यामागून जाते. कल्याणी गंभीर होऊन तशीच जिन्याजवळ उभी रहाते. माडीवर दामुअण्णा हणमंतरावांना काय सांगत असतील, हें जणू काय तिला ऐकू येत असावें. कारण दामुअण्णांच्या बोलण्याला उत्तर देण्यासाठीं मधून-मधून तिच्या तोंडूनही उद्गार निघतात. ]

**दामुअण्णा :** [ माडीवर ] अरे हणमंता, तूं म्हणे मुंबईला चाललास ! अरे तुला काय वेडबिड लागलंय् कीं काय ? काय भलतंच डोक्यांत घेतलंस हें ? अरे किती झालं तरी ती नायकिणीची पोर—

**कल्याणी :** छेः—एका प्रतिष्ठित ब्राह्मण बापाची मुलगी—

**दामुअण्णा :** [ माडीवर ] असेल तुझ्या पोटची. म्हणून जातकूळ कांहीं, पाहायला नको ? अरे शेण घालतील शेण तोंडात सारे लोक ! पुण्यांतला ब्राह्मण मुंबईला चालला म्हणे ! आणि कुठं, तर एका नायकिणीच्या घरीं राहायला !—

**कल्याणी :** छेः—आपल्या बायकोच्या घरीं राहायला—

**दामुअण्णा :** [ माडीवर ] नुसता उतरायला नव्हे—राहायला—जन्मभर राहायला ! अरे, चार दिवस मनेखातर गेला असलास त्यावेळीं म्हणून काय जन्माची जबाबदारी घेतलास तिची ? काय संबंध तिचा न् तुझा ?

**कल्याणी :** सांगायलाच हवा का त्यांचा आणि आमचा संबंध ? मजेखातर चार दिवस आमच्या घरीं यायला, आमचं घर म्हणजे काय तुम्हांला स्टेशनचा प्लॅटफॉर्म वाटला ? तुम्हीं यावं, बेजबाबदारपणानं वागून निघून जावं— आणि आम्हीं जन्मांत त्याचा उच्चार करूं नये—कसली अपेक्षा करूं नये—तुमच्या उच्छृंखल वासनांची तृप्ति करण्यासाठीं—तुमची जन्मोजन्मीं निरपेक्ष सेवा करण्यासाठीं गुरासारखी आमची जात ब्रह्मदेवान जन्माला घातली आहे--एवढीच भावना आहे तुमची आमच्याबद्दल ! या तुमच्या भावनेमुळें आमचीहि तुमच्याकडे पाहाण्याची दृष्टि कशी झाली आहे सांगूं ? आपल्या अश्राप धर्म-पत्नीशीं, आपल्या खानदानी कुळाशीं आणि तुम्हांला परमेश्वरानं ज्या जातींत जन्माला घातलं त्या मानव-जातीशीं बेइमान होणारे तुम्हीं हीन अधम पुरुष आहांत. स्त्रीबद्दलच्या पवित्र, उदात्त भावनांचा लवलेश तुमच्या ठायीं नाहीं. ज्या स्त्रीनं तुम्हांला जन्माला घातलं, त्या स्त्री–जातीशीं तुम्ही उच्छृंखलपणान, बेजबाबदारपणानं—केवळ मजेखातर गलिच्छ संबंध ठेवता ! कसला चारित्र्याचा आणि कुळाशीलाचा बडेजाव मिरवतां तुम्हीं ? माझी आई बावीस वर्षांपूर्वी भेटलेल्या भाऊकाकांशीं आजपर्यंत इमान राखून राहिली —भाऊकाकांना इतक्या वर्षांत तिची कधीं आठवण तरी झाली ? ही तुम्हां पुरुषांची माणुसकी—हें तुम्हां पुरुषांचं चारित्र्य ! तुम्हां बेइमानी पुरुषांपेक्षां आम्हीं हीन कुळांत जन्मलेल्या स्त्रियादेखील शतपटीनें श्रेष्ठ, चारित्र्यवान आणि शीलवान आहों.

[ भरभर माडीवर जातें. थोडा वेळ स्टेज रिकामेंच असतें. काहीं वेळानें जयंत व शिरसाट येतात. ]

**जयंता :** [ इकडे तिकडे फेऱ्या मारून नतर एका खुर्चीवर बसत ] बोलवा तुमच्या मालकांना.

**शिरसाट** : बोलावतों. पण त्यांना लागेल असं कांहीं कृपा करून बोलूं नका. एकाएकीं पंचवीस वर्षांनीं म्हातारे दिसायला लागले आहेत मालक— कल्पना नाहीं तुम्हांला.

**जयंता** : चांगली कल्पना आहे मला.

**शिरसाट** : नाहीं हो—तुम्हांला मुळींच कल्पना नाहीं. मी त्यांना हॉटेलांत पाहिलं आणि आतां थोड्या वेळापूर्वी छापखान्याजवळ त्यांची गांठ पडली. माझा डोळ्यांवर विश्वास बसेना ! तेवढ्या वेळांत काय घडलं असेल तें देव जाणे !

**जयंता** : देव कशाला-- मी जाणतों सारं. जा, बोलवा त्यांना.

[ शिरसाट जड पावलांनीं माडीवर जायला निघतो. जयंता प्रक्षुब्ध मनःस्थितींत इकडे तिकडे फिरतो व पुन्हां एका खुर्चीवर बसतो.
थोड्या वेळानें हणमंतराव दोन्ही हातांत दोन बॅगा घेऊन जिना उतरत येतात. ते आणखी पंचवीस वर्षांनीं म्हातारे दिसतात. त्यांच्यामागून दामुअण्णा त्यांचा हात धरीत येतात. जयंता त्यांच्याकडे ढुंकूनही पाहात नाहीं. ]

**दामुअण्णा** : इतका कसा तूं बिरघळून गेलास ? अरे, एवढ्या मोठ्या कॉंग्रेसपक्षाचा पुढारी तूं—एका वर्तमानपत्राचा प्रतिष्ठित संपादक--एवढं सार्वजनिक महत्त्व आलं आहे तुला--

**हणमंत** : त्या सार्वजनिक महत्त्वासाठीं माझं वैयक्तिक महत्त्व—माझी वैयक्तिक जबाबदारी मी टाळूं शकत नाहीं, दामुअण्णा. अरे, ज्याला आपली वैयक्तिक जबाबदारी पाळतां आली नाहीं, तो सार्वजनिक जबाबदारी कसली शिरावर घेणार ? ज्याचे हातपाय चिखलानं बरबटलेले आहेत, तो जगाला कसले स्वच्छतेचे धडे देणार ? मी भावनावश होऊन हा निर्णय घेतला असं मुळींच समजूं नकोस.—अगदीं पूर्ण विचार करून मी हें पाऊल टाकतों आहें.

**कानुअण्णा :** मग जा—पड जाऊन खड्डयांत. डोळे उघडे ठेवून तुला विहिरींत जीव द्यायचा आहे—तर त्याला कोण काय करणार! जा—कर काय वाटेल तें.

[ तावातावानें आपल्या खोलींत निघून जातात. हणमंतराव क्षणभर त्यांच्याकडे पाहात राहातात. नंतर हातांतील दोन्ही बॅगा खालीं ठेवून जयंताकडे पाहात त्याच्या दिशेनें येतात. ]

**हणमंत :** मी तुला इथं यायचा त्रास दिला, याचा राग धरूं नकोस. ही आपली आतां शेवटची भेट आहे. [ जयंता त्यांच्याकडे चमकून पाहातो. ] आतांपर्यंत आपल्या दोघात असलेल्या राजकीय मतभेदांमुळें आपण एक-मेकांना दुरावलोंच आहों. तरी देखील जगाला दाखविण्याइतकं बाप-लेकांचं नातं आपण शिल्लक ठेवलं होतं. आता तें कायमचं तुटणार आहे. यापुढं—यापुढं आपली कायमची ताटातूट होणार आहे. [ खिशांतून किल्ल्यांचा जुडगा काढून ] ह्या किल्ल्या घे. छापखान्याच्या, तिजोरीच्या, घराच्या—सान्या आहेत त्यांत. माझ्याविरुद्ध कामगारांना संपावर पाठवून तूं छापखाना बंद पाडलास—तो आतां तूंच आपल्या हातानं उघड. आतां तूंच त्याचा मालक. माझं आतां इथं कांहीं राहिलेलं नाहीं. जातांना तुझ्या-कडे एकच भीक मागतों—आतांपर्यंत माझ्याशीं तेढ धरलीस ती धरलीस—आतां जातांना माझ्याबद्दलचा तुझ्या मनांतला राग काढून टाक. तुझ्या कुठल्याही गोष्टीच्या आड हा तुझा एकेकाळचा बाप यापुढं येणार नाहीं.

**जयंता :** [ गुदमरलेल्या स्वरांत ] पण—पण इथून जाण्यांत तुमचा कसला उद्देश आहे.

**हणमंत :** उद्देश ? माझा उद्देश तुला कळला, तर तूं पाठीला पंख लावून मला मुंबईला घेऊन जाशील. किंवा—किंवा मला लाथाबुक्यांनीं मारून ह्या दरवाज्याबाहेर फेंकूनही देशील !

**जयंता** : भाऊकाका !

**हणमंतराव** : होय, जयंता. तुझ्या बापाच्या हातून आयुष्यांत एवढा एक मोठा गुन्हा घडला आहे, कीं त्याची क्षमा देवदेखील करणार नाहीं. मी एकेकाळीं गुन्हा केला—आणि आजपर्यंत मला त्याचा विसर पडला होता. आज मला त्याची आठवण झाली—नाहीं, मला त्याची आठवण करून देण्यांत आली. तेव्हांपासून प्रत्येक क्षणाला मी वर्षांवर्षांनं म्हातारा होतों आहे. चोहोंबाजूंनीं माझ्या मनाला इंगळ्या डसताहेत. राख—राख होते आहे माझ्या अंत:करणाची.

**जयंता** : काय म्हणतां आहां तुम्ही हें ! कसला गुन्हा—कुणी आठवण करून दिली—

**हणमंत** : सांगतों—तुला सारं सांगण्यासाठींच बोलावलं आहे. बापाचं मोठेपण—मनाची सारी लाजलज्जा सोडून तुला सांगणार आहे मी. तुला शिकतां आली, तर एकच गोष्ट त्यापासून शिकतां येईल. यापुढं कुठल्याही स्त्रीकडे पाहातांना, आपली वासनापूर्ति करणारी ती एक हाडामांसाची बाहुली म्हणून तिच्याकडे पाहूं नकोस; तूं जन्माला घालीत असलेल्या अपत्याची संरक्षक देवता म्हणून तिच्याकडे पाहा. पुरुषाचा क्षणाचा खेळ होतो, पण स्त्रीचा जन्माचा कर्मभोग उभा राहातो. आपल्या त्या यःकश्चित् कृतीचा त्या क्षणानंतर पुरुषाला कायमचा विसर पडतो, पण स्त्री मात्र त्या क्षणापासून तीच एक स्मृति अंत:करणांत जतन करून ठेवीत असते. तूं म्हणशील, मी वेड्यासारखा काय बरळतों आहे ! पण हें वेड नाहीं; असलं तर प्रत्येक पुरुषाला लागावं असं वेड आहे. हें वेड लागून आज मी शहाणा झालों आहें.

[ कल्याणी हातांत एक गांठोडें घेऊन जिन्यावरून येऊं लागते. अंबूच्याही हातांत एक लहान पेटी आहे. जयंताची तिच्याकडे दृष्टि जाताच तो आपलें तोंड फिरवतो. ]

ये कल्याणी. [ जयंताला उद्देशून ] हिचा तुला मघां राग आला. ही बोलली तें ऐकून तुझा संताप झाला. तूं नाहीं नाहीं तें बोललास. आपल्या जाती-बद्दल ती वाटेल तें काय बोलली; तूंही बोललास. पण—पण—कसं सांगूं तुला ? तूं रागानं निघून गेलास आणि मी हिचे पाय धरले. [ जयंता गोंधळ-लेल्या मुद्रेनें त्यांच्याकड पाहातो. ] तुला बोलतांना तिनं कुठलं काळीज आणलं होतं, तें तिचं तिला माहीत. बायकांचं मन मृदु असतं म्हणतात; पण प्रसंगीं त्यांच्यासारखं कठीण मन आम्हां पुरुषांनाही करतां यायचं नाहीं. जयंता—अरे, तुझ्यासारखीच ही माझ्या पोटची पोर आहे रे !

**जयंता** : भाऊकाका ! तुम्ही—ही—

**हणमंत** : होय जयंता—अगदीं निर्लज्जपणानें सांगतों तुला—बावीस वर्षांपूर्वी—तूं वर्ष दोन वर्षांचा असताना हिचा जन्म झाला. बावीस वर्षांनीं मला आज हें कळलं. केवढा घोर अन्याय केला मी हिचा आणि हिच्या आईचा ! कुठल्या नरकांत जाणार आहें मी !

**कल्याणी** : भाऊकाका, काय असं बोलतां हें ?

**हणमंत** : पोरी, बोलूं नको तर काय करूं ? कशीं काढलींत इतकीं वर्षे तूं आणि तुझ्या आईनं ? काय वाटलं असेल तुझ्या आईला ! किती शाप दिले असतील तिनं मला ! तिला नवरा नाही, आणि तुला बाप नाहीं ! आणि मी—मी उजळ माथ्यानं इथं मिरवतों आहें ! तुझा जन्म झाला, त्याच क्षणाला मी तिचा नवरा आणि तुझा बाप झालों. कशाला हवे भटजी आणि वाजंत्री ! कशाला हवा लाजाहोम आणि सप्तपदी ! संतति जन्माला आली, कीं त्या क्षणाला देवाघरीं लग्न रुजू झालं. लग्नविधीचं खोटं, दांभिक प्रदर्शन कशाला हवं ? ऋणानुबंधानीं जडलेल्या जन्माच्या गांठी या, त्या कशा तुटणार ? बावीस वर्षं हिच्या आईनं अज्ञातवासांत काढलीं.—आपणच काढलीं नाहीं, तर ह्या कल्याणीलाही काढायला लावलीं. काल-परवांपर्यंत मी कोण हें हिला माहीत नव्हतं. सांग आतां मला—अजून तूं

हिचा राग धरणार ? बावीस वर्षे जिनं बापावांचून काढलीं, तिच्या यातनांची भरपाई तूं अशी करणार ? आतांपर्यंत तुझी ती नुसती मैत्रीण होती—आतां आणखी बहिण झाली आहे.

**जयंता** : [ असह्य होऊन ] नको भाऊकाका—कृपा करून असलं कांहीं बोलूं नका.

**हणमंत** : अरे, बोललों नाहीं म्हणून तें खोटं थोडंच होणार आहे ! तूं तिला बहीण मानायला तयार नसलास, तरी माझी ती मुलगी आहे. आजपर्यंत तूं माझ्याजवळ होतास—यापुढं ही माझ्याजवळ राहील. माझं उरलेलं आयुष्य आतां हिच्या आणि हिच्या आईच्या संगतींत जाईल. —ये अंबू, ह्या पोरीच्या बाबतींत माझं आतां एक कर्तव्य उरलं आहे. मी कधीं कांहीं तुझ्याकडे मागितलं नाहीं, पण आज जातांना—तुझ्यापासून कायमचा जातांना, माझ्यासाठीं—मी तुला जन्म दिला त्याचं ऋण फेडण्यासाठीं म्हणून वाटलं तर समज—पण या अंबूला पदरांत घे. दामुअण्णा माझ्यावर रागावला आहे. पण आतां त्याच्याच हवालीं तुम्हां दोघांना करून गेलं पाहिजे मला.

[ आंत जातात. जयंता आणि कल्याणी एकमेकांकडे न पहातां तशींच उभीं रहातात. ]

**जयंत** : ( एकदम आपल्या हातांनीं तोंड झांकून ) बहीण—बहीण—कल्याणी—

**कल्याणी**: होय—बहीण अगदीं नकळत झालेली बहीण. तुझ्या आणि माझ्या भाऊकाकांनीं कुठल्यातरी बेजबाबदार क्षणाला बळी पडून जन्माला घातलेली तुझी ही बहिण. त्यावेळीं त्यांना कल्पनाही नसेल, त्यांच्या क्षणिक लहरीमुळं पुढं वीस वर्षांनीं दोन जीवांचा असा चुराडा होणार आहे !—जाऊं दे. माझा त्यांच्यावर आतां राग नाहीं. मी त्यांना माझ्या आईपाशीं फर-फटत ओढीत न्यायला आलें होतें. पण त्यांनीं मलाच लाजवलं. त्यांना मी

सांगणार होतें--ही पाहा माझी आई आज बावीस वर्षं तुमचा ध्यास घेऊन आपल्या आयुष्याच्या घटका मोजते आहे. ज्या जातींत स्त्रियांची किंमत पैशानं केली जाते त्या जातींत एका पैचीही आशा न ठेवतां तुमच्यावर जीव ठेऊन राहिलेली ही पहा माझी आई--पण माझ्या आईचा फोटो पाहून त्यांच्या अंतःकरणांतल्या बावीस वर्षांपूर्वी करपून गेलेल्या भावना पुन्हा उमलल्या, आणि ते आपण होऊन माझ्याबरोबर मुंबईला यायला निघाले. त्यांना पाहून माझ्या आईला अस्मान ठेंगणं होईल. देवेंद्राचं सिंहासन देखील ती यावेळीं धुडकावून लावील. बावीस वर्षांनीं कां होईना, माझ्या आईला मी सुख देऊं शकलें, या एका विचारापुढं माझ्या सगळ्या दुःखांचा मी स्वतःला विसर पाडून घेईन.—तूंही शहाणा हो. बहीण होऊन मी आणखी तुझ्या जवळ आलें आहे. प्रेमभंग झालेल्या दुबळ्या माणसासारखा हताश होऊं नकोस. भाऊकाकांनीं सारं कांहीं तुझ्या हवालीं केलं आहे. त्याची जबाबदारी पार पाड. [ एकदम कुठल्यातरी विचारानें खिन्नपणानें हंसून ] कच—देवयानीची आठवण येते मला यावेळीं. [ अंबू-कडे लक्ष जाऊन ] ही माझी वहिनी होणार आतां.—असा सुस्कारा सोडूं नकोस. या बिचारीनं तुझ्यावर एवढा जीव ठेवला आहे, कीं तिचा तूं अव्हेर करणं देवाघरीं पाप ठरेल.

**अंबू :** असं कां म्हणतां ? त्यांच्या मनाला माझी ओढ लागावी, असं काय आहे माझ्यापाशीं ? इतके दिवस इथं राहून मी आधींच त्यांच्या मनाला दुःख दिलं आहे. या गोष्टी काय सक्तीनं होत असतात ? मीं अण्णांना सांगितलं आहे— पुन्हां आम्हीं आमच्या घरीं जाणार आहों तुम्हीं भाऊ-काकांना मुंबईला घेऊन गेल्याबर.

**कल्याणी :** याला इथं एकटाच टाकून ?

**अंबू :** मग काय यांना आणखी दुःख द्यायला इथं राहूं मी ? दिलं तेवढं पुरे. ज्यांनीं आकाशाला गवसणी घालायची आशा धरली, त्यांना काय

माझी ही फाटकी घोंगडी पुरी पडणार? माझ्यापासून यापुढं त्यांना कसलाच त्रास होऊं देणार नाहीं मी. तुम्हीं कांही सांगू नका.

**कल्याणी :** पण भाऊकाका गेल्यावर याला एकटाच इथं टाकून जाण्यांत तुम्हीं चूक नाहीं का करीत? अशा वेळी तर त्याला मायेच्या माणसाची जास्त जरूरी आहे. इतके दिवस त्याच्यासाठीं तुम्हीं जीव सांडलात, आणि ज्या क्षणाला तुमची खरोखरीच जरूरी आहे त्या क्षणाला निघून जायला लागलांत! नका असं करूं. जयंता, तूं यांना जाऊं देऊं नकोस-माझ्या-साठीं. [ भाऊकाका व दामुअण्णा येतात. ] भाऊकाका, तुम्हीं "विद्या-हरण" नाटक पाहिलं आहे का हो? त्यांत शेवटीं कच निघून जातो. आज देवयानी निघून जाते आहे-शुक्राचार्याला घेऊन! [ मोठ्यामोठ्यानें हंसते. तेथील उदास वातावरण प्रफुल्लित करण्याचा तिचा उद्देश आहे हें सहज कळून येतें. ] मात्र या दोघांच्या लग्नाचा बार उडवायला मीं आणि भाऊकाका—आणि जमलं तर माझी आई इथं येणार आहों—बरं का दामुअण्णा!-पण घ्याल ना तिला घरांत? नाहींतर म्हणाल, तुमच्यांत आणि आमच्यांत फरक आहे.

**दामुअण्णा :** अहो, आतां हा हणमंताच चालला तुमच्या घरीं राहायला-तिथं आम्ही बडेजाव मिरवून काय उपयोग आमच्या कुलाचा न् शीलाचा! बाकी हणमंता, तूं सर्वसंगपरित्याग करून मुंबईला चालला आहेस ही बातमी वर्तमानपत्रांत छापून येते कीं नाहीं पाहा. अरे, टपलेलीं असतात तुमचीं हीं वर्तमानपत्रं एकमेकांचीं वर्मं काढायला!

**हणमंत :** आतां वर्तमानपत्रांत आलं काय आणि रेडिओवर सांगितलं काय—मला कांहीं सुखदुःख नाहीं त्याचं! माझ्या मनाला आतां जें समाधान होणार आहे, त्यापुढं मला कशाचीच पर्वा वाटत नाहीं.—चल कल्याणी. जयंता—

[ पुढें त्यांच्या तोंडून शब्द फुटत नाहीं. ते त्याला कडकडून मिठी मारतात. ]

**कल्याणी :** कॉंग्रेस आणि कम्युनिस्ट पक्षांत इतकी दिलजमाई प्रथमच पाहायला मिळते आहे ! [ हंसते. ]

**दामुअण्णा :** कसली कॉंग्रेस आणि कसला कम्युनिस्ट ! चार दिवस झगडे चालायचे—पण अखेर रक्ताला रक्त मिळायचंच.

**हणमंत :** हो—रक्ताला रक्त मिळायचंच. नाहीतर ही कल्याणी कालपरवां येते काय आणि मी तिच्याबरोबर घरदार सोडून निघतो काय ! रक्ताचाच प्रभाव हा !—येतों मी. माझ्या जयंताला नीट सांभाळ. अंबू, तूंही. शिरसाट, छापखाना नीट चालवा. माझ्यामागं जयंता असला, तरी इतक्या वर्षांचा तुम्हाला अनुभव आहे.

**कल्याणी :** च् च् च्—त्यांना उगीच ठेवतां आहां छापखान्यांत पुन्हा. अहो, त्यांच्या दोन बायका आणि अकरा मुलं शाप देतील तुम्हाला, भाऊकाका.

**हणमंत :** जयंता—मला येऊन नेहमीं भेटत जा.

**कल्याणी :** आणि वहिनी, तूंही ये—भाऊकाकांकडे. आमच्याकडे नव्हे हं !

**अंबू :** कशाला असं बोलून लाजवतां मला ?

**दामुअण्णा :** येऊं—येऊं—आतां तुमच्या आईच्या पायां पडायलाच पाठवून देतों या दोघांना ! बाप जातोच आहे पुढं—आतां मुलगाही येईल.

[ हणमंतराव व कल्याणी जातात. त्यांना पोंचविण्यासाठीं दामुअण्णा आणि शिरसाटही बाहेर जातात. ]

**अंबू :** [ थोड्या वेळानें ] तुम्हाला खूप वाईट वाटलं असेल भाऊकाका गेले म्हणून !

**जयंता :** त्याचं वाईट नाहीं वाटलं. वाईट वाटलं, तें आजपर्यंत मी माझ्या भाऊकाकांना ओळखूं शकलों नव्हतों याचं. दुसरा कुणी असता, तर कुणा एके काळीं केलेल्या आपल्या पापाची पर्वाही केली नसती त्यानं.

—बावीस वर्षांपूर्वीच पाप त्यानं फुंकर मारून विझवलं असतं. पण भाऊकाकांनीं आपल्या अंतःकरणाच्या हांकेला ओ दिली आणि आपणहून कल्याणीच्या घरीं जाण्याची माणुसकी दाखविली. जगांत होणारी अपकीर्ति, कुचेष्टा, मानखंडना खुषीनं स्वीकारून तिच्या घरीं जायला ते निघाले. देवाहूनही मोठे वाटताहेत माझे भाऊकाका मला आज. भाऊकाका—तुम्हीं माझ्यापासून दूर दूर जातां आहां—पण जातांना माझा हा नमस्कार सावलीसारखा तुमची जन्मभर सोबत करील.

[ भक्तिभावानें नमस्कार करतो. दामुअण्णा येतात आणि त्याच्याकडे पाहात राहातात. ]

— समाप्त —



फुकट पास

एकाद्या प्रसिद्ध कंपनीचं पांच तासांचं नाटक फुकट पास मिळत असतांनासुद्धां आपण भरपूर पैसे खर्च करून नाट्यनिकेतन लि०चें

कोणे एके काळीं

पाहाण्यास वाटेल तितक्या लांबून येतां व तसेंच

मुंबईंत वाटेल तेवढे टेलर असतांना बहुतेक

धि टेलर आणि कंपनींतूनच

शिवलेले कपडे पसंत करतात. याचं कारण म्हणजे कोणत्याहि फॅशनचे कपडे अगदीं माफक दरांत शिवून मिळत असून त्याला लागणारें सर्व तऱ्हेचें कापड अगदी माफक भावांत मिळतें. तसेंच आपल्याला एखादा रेडिओ खरेदी करावयाचा असेल तेव्हां चुकूं नका—

धि टेलर आणि कंपनी ( रजिस्टर्ड )

ताराबागसमोर, चर्नीरोड, मुंबई, ४.

# शारीरिक उष्णतेमुळे !!!



जडलेला अपचनाचा विकार
बारीक पोटदुखी, मलावरोध
उष्णता वाढून सर्व अंगाची
आग, वगैरे तक्रारींसाठीं-



शारीरिक उष्णतेवरचा अनुभविक उपाय

**शीतल, शक्तिवर्धक, आरोग्यदायक**

# पर्लकाढा

आजच सुरू करा
सर्व
केमिस्टकडे मिळतो

9-46/No 8

**पर्ल कंपनी**, आर्यौषधी कारखाना, राणीबाग, मुंबई २७

# रामतीर्थ ब्राम्ही तेल



**[ स्पेशल नं. १ ]**

* पांढरे केस काळे होतात. * स्मरणशक्ति वाढते. * टक्कलावर केस उगवतात. * शांत झोप येते. * दृष्टी सुधारते. * केस लांब सडक होतात. * गळणारे केस थांबतात. डोकेदुखी थांबते.

**मोठी बाटली ३॥ रु. लहान बाटली २ रु.**

टपालखर्च निराळा.

**सर्वत्र मिळतें**

## श्री रामतीर्थ योगाश्रम

**उमेशधाम, २७, व्हिन्सेंट स्क्वेअर,**

दादर सेंट्रल रेल्वे स्टेशन जवळ, मुंबई नं. १४.

# स्वर्गीय संगीत

सर्व प्रकारचीं तंतुवाद्यें

तंबोरा, सतार, दिलरुबा

सरोद, बीन, हार्मोनियम,

वगैरे वाद्यें तयार मिळतील.

## रघुनाथ एस. मयेकर

हार्मोनियम, सतार मेकर

सँडहर्स्ट रोड, मुंबई ४.

SDS

नाटक कंपनी व फिल्म कंपनीकरितां ऑर्गन, पियानो
आणि सर्व तऱ्हेचीं तंतुवाद्यें भाड्यानें दिलीं जातात.

एम्ब्रॉयडरी आणि विणकाम यांस लागणारें
हरतऱ्हेचें साहित्य मिळण्याचे जुने आणि
प्रसिद्ध व्यापारी
म्हणजेच

# एम. मधुकर आणि ब्रदर्स

हरगंगा महाल, दादर, मुंबई १४
टे. नं. ६०६७७

हरतऱ्हेच्या दिलखेचक पेन्टिंग कामाकरितां
२३ वर्षें नांवाजलेले



# — पेन्टर फडके —

आप्पा बळवंत चौक ........... पुणें २
★ अर्जेन्ट कापडी बोर्ड ही आमची स्पेशॅलिटी ★